







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली

साहित्य • कला • संगम

## श्रेयनामावलि

**कथा :**



**रहस्यमय सत्यकथा :**



**काव्य :**



**ललित लेख :**



**वैचारिक लेख :**






वर्ष १६ वें
जुलै [illegible]

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी-ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतानच असें नाहीं.





दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रिज . मुंबई ४




आषाढ शके १८८२ जुलै १९६०

# ज्ञानीयांचा राजा ज्ञानदेव

अादिनाथ गुरू सकल सिद्धांचा । मच्छींद्र तयाचा मुख्य शिष्य ॥
मच्छींद्रानें बोध गोरक्षासी केला । गोरक्ष वळला गहिनी प्रती ॥
गहिनी प्रसादें निवृत्ती दातार । ज्ञानदेवा सार चोजविले ॥
ज्ञानियांचा राजा ज्ञानेश्वर माउली । खेचरा वोळली कृपासिंधू ॥

महानुभाव, वैदिक, बौद्ध, जैन, शांकर, वैष्णव, शाक्त, विठ्ठल, नाथ इत्यादि संप्रदाय, जे आपापल्या पंथांचा व मतांचा भारतवर्षांत प्रचार करीत होते, त्यांतला नाथ संप्रदाय हीच ज्ञानेश्वर माउलींची गुरुपरंपरा. वरच्या अभंगांत विसोबा खेचरांनीं ती स्पष्ट केली आहे.

वरील सर्व पंथ आपापल्या परीनें मोक्षमार्ग दाखवण्यांत गढून गेले होते; परंतु चातुर्वर्ण्यावळींतील पहिल्या वर्णालाच तेवढा त्यांच्या म्हणण्यांचा आशय आकळला होता. शंकराचार्यांच्या सिद्धांतांच्या सृष्टींत तर स्त्री-शूद्रांस मोक्षाच्या वाड्याचीं दारें बंद होतीं. 'द्विज' या शब्दाभोंवतीं एक तेजोवलय निर्माण झालें होतें. त्यामुळें साहजिकच त्यांच्यांत अहंमन्यता वाढली. आणि इतर वर्ण्यांना तें कस्पटासमान लेखूं लागले. सावलीचाहि विटाळ मानून इतरांस दंडण करूं लागले.

अशा काळीं संन्यासदीक्षा घेतलेल्या विठ्ठलपंतांनीं गुरूच्या आज्ञेनें पूर्ववत् गृहस्थाश्रम स्वीकारून त्यांना निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई अशीं चार मुलें झालीं. (शके–अनुक्रमें, ११९५, ९७, ९९, १२०१) संन्याशानें फिरून गृहस्थाश्रम पत्करला, याबद्दल त्या काळांतल्या 'द्विजांत' विठ्ठलपंतांचा उपहास होऊन त्यांना वाळींत टाकण्यांत आलेंच होतें; परंतु मुलांच्या मुंजी करावयाच्या वेळीं "तुम्हांला व तुमच्या मुलांना जाति, कुळ, वर्ण व अधिकार नाहीं ! तुम्हीं प्रायश्चित्त घेऊन पैठणहून शुद्धिपत्र आणा. तें आम्ही वंद्य मानूं" असें सांगून मुंजी लावण्याचें नाकारलें. तेव्हां मात्र या पितापुत्रांस अत्यंत खेद वाटला.

ब्राह्मणांच्या म्हणण्याप्रमाणें शुद्धिपत्र आणण्यास हीं भावंडें पैठणास गेलीं. इथेंच ज्ञानदेवानीं रेड्याच्या तोंडून वेद म्हणविला. हें पाहून त्यावेळच्या विद्वानांनीं चकित होऊन त्यांस शुद्धिपत्र दिलें. शुद्धिपत्र घेऊन हीं भावंडें 'नेवासें' येथें आलीं व तेथेंच त्यांनीं वास्तव्य केलें.

संन्यासाश्रमांतून गृहस्थाश्रमांत परत येऊन आपण एक महत्पाप केलें. या पापाचें क्षालन आत्महत्तेखेरीज होऊंच शकणार नाहीं अशा दृढ कल्पनेनें विठ्ठलपंतांनीं प्रयागक्षेत्रीं जाऊन गंगेंत जलसमाधि घेतली. विठ्ठलपंतांमागून रुक्मिणीबाईनींहि कंटाळून देहत्याग केला. मातापित्यांच्या अशा रीतीनें केलेल्या देहत्यागामुळें मुलांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला.

भागवतधर्माचें मूळ म्हणजेच समता. ती बाजूला सारून केवळ अहंमन्यतेच्या जोरावर मोक्षाचीं दारें फक्त आपल्यालाच खुलीं आहेत, इतर वर्णांना तिथें मज्जाव आहे, अशी समजूत करून घेऊन द्विजांनीं इतरांचा जो छळवाद चालवला होता, तो पाहून ज्ञानदेवांच्या मनांत तर कल्लोळ माजला. आणि आत्मानुभवाच्या पायावर भक्तिज्ञानाचें मंदिर उभारून तें कुळ जातीचा विचार न करतां सर्वांनां खुलें करून, शुद्ध परमार्थाची वाट उजळून दाखविणें हेंच त्यांनीं आपलें जीवितकार्य ठरविलें. त्याच धुंदींत त्यांनीं (इ. स. १२९० सालीं) आपली गीतेवरील महान् टीका लिहून पूर्ण केली–आणि महाराष्ट्रांत एका महान परंपरेचा उदय झाला.

वाङ्मयीन टीकेचें एवढें प्रभावी भव्योदात्त रूप दुसऱ्या कोणत्याच देशी भाषेंत अशा तऱ्हेनें साकार झालेलें नाहीं. ग्रंथकार आणि ग्रंथकर्ता यांचें सामाजिक आणि धार्मिक उत्थापनांतील एवढें तेजःपुंज यश इतरत्र विरळा. शेंकडों वर्षें लोटलीं, यादवशाही गेली, बिदरशाही, मोंगलाई, शिवशाही, पेशवाई—इतकंच काय पण पारतंत्र्य आलं नि गेलं—पण ज्ञानेश्वरीसारखा अद्भुत ग्रंथ मराठी माणसाच्या जीवनांत आहे तेंच स्थान टिकवून आहे. गेलीं साडेसहाशें वर्षें ज्ञानदेवीनें वाट चुकलेल्या मराठी मनाला नीट ताळ्यावर आणलें आहे, अंधःकारमय जीवनांत प्रकाशाचें चैतन्य निर्माण केलें आणि मराठी समाजांतील एकता अखंडितपणें टिकविण्याचें अवघड कार्य केलें.

श्री ज्ञानदेवांची महति अशासाठीं कीं आमची मायबोली त्यांची कायमची ऋणी आहे. पंतपंडितांच्या आणि राजाश्रयाच्या जोरावर मान्यता मिळविलेल्या गीर्वाण भाषेच्या तत्कालीन भरभराटीच्या काळांत लोकजागृतीच्या [illegible] मायबोलीचें माध्यम

(पान ६ वर चालू)








श्री ज्ञानेश्वर

जें खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
ईश्वर वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥

— श्री ज्ञानेश्वर

अनुक्रमणिका

आवश्यक होतें. सांकेतिक प्रवृत्तीचा हिंदू माणूस प्रस्थानत्रयीच्या पलीकडे कोणत्याच तत्वज्ञानाची मुलाहिजा ठेऊं इच्छित नव्हता. अशा वेळीं ज्ञानदेवांसारख्या एका अल्पवयीन महात्म्यापुढील कामगिरी खरोखरच बिकट होती. येऊं घातलेलें परचक्र आणि समाजांतील देवतावारीमुळें झालेलें विभाजन यामुळें मराठी समाज खंडित झाला होता. अशा परिस्थितींत या खंडित समाजाला एकत्र आणण्यासाठीं, नवें सामाजिक चैतन्य निर्माण करण्यासाठीं भारतीयांच्या जीवनावर जिचा खोल संस्कार झाला आहे अशा भगवद्गीतेचा ज्ञानदेवांनीं आश्रय घेऊन समाजासमोर एक नवा आदर्श ठेवला. गीर्वाण भाषेला डावलून मराठी भाषेची महति जनतेसमोर घिटाईनें गाऊन बहुजनांना त्यांच्याच भाषेंत, त्यांना समजेल, रुचेल आणि पचेल अशा शैलींत ज्ञानदेवांनीं गीतेवरील आपली अपूर्व अशी टीका निर्माण करून मराठी भाषेला कायमचें ऋणी करून ठेवलें. ज्ञानेश्वरीसारखा एक महान् ग्रंथ एका समाजाला शेंकडों वर्षे तारक ठरूं शकतो, मार्गदर्शक होतो, त्याच्या दैनंदिन जीवनांतील एक स्थायी विशेष बनतो, हा एकप्रकारें वाङ्मय प्रांतांतील चमत्काराच होय.

ज्ञानेश्वरीनें मराठी मन जाग्रत केलें. लोकजाग्रतीचें काम ज्ञानदेवीनें केलें हें निश्चितच! तत्कालीन समाजांतील वेगवेगळ्या थरांतील आणि घटकांतील व्यक्तीनां एक नवा दिलासा देण्याचें कार्य ज्ञानदेवांनीं केलें. हीन दीन समजल्या जाणाऱ्या उपेक्षित जमातींत तर एवढी जाग्रति झाली कीं ज्ञानेश्वरांची एक ज्वलंत प्रभावळ या पतित जमातीनीं महाराष्ट्राला सादर केली. या प्रत्येक समाजांतील कांहीं व्यक्ति ज्ञानदेवांप्रमाणेंच नेतृत्व आणि ग्रंथकर्तृत्व याबाबतींत आघाडीवर राहिल्या. चोखा मेळा, विसोबा खेचर, गोरा कुंभार, सांवता माळी, जनाबाई इ. संतांनीं ज्ञानदेवांच्या पावलांचा मागोवा घेत जें कार्य केलें त्याचें ऋण आम्ही अजून फेडीत आहोंत. वर्णभेदांनीं पांगला गेलेला मराठी समाज आपापले मतभेद विसरून चंद्रभागेच्या वाळवंटावर हरिसंकीर्तन आणि विठ्ठलाच्या नामघोषांत गर्क झाले. योग यागविधी। येणें नोहे सिद्धि। वायांची उपाधी। दंभ धर्म॥ हे सर्वांना पटूं लागलें होतें. ईश्वरप्राप्तीसाठीं नामजपाचा हा सर्वसुलभ मार्ग मराठी शेतकऱ्याला इतका पटला आणि इतका रुचला कीं लाखों मराठी मुखांतून 'विठ्ठल विठ्ठल' चे निनाद सह्यगिरीच्या कड्याकपारींत आणि दऱ्याखोऱ्यांत सातत्यानें घुमत राहिले.

अलंकापुरीं, वयाच्या बावीसाव्या वर्षी ज्ञानराजांनीं अवतार समाप्ती केली. "जगदोद्धार केला संसारीं। बावीस वरुषें असता पै॥"

संत नामदेवांच्या म्हणण्याप्रमाणें ज्ञानदेव हे मनुष्यकोटींतले नव्हतेच.

धर्मरक्षणार्थ पहा हो। मनुष्यरुपें अवतरले

आणि इतकंच नव्हे तर

"जो जो दिवस उगवला। तो तो ज्ञानदेवें सफळ केला॥"

• • •








**श्रृंगार**

**श्रीरंग**



राजा ४७

## अक्लेश

## केशव

### द्वितीय सर्ग

रमतां वनिं रमणीसंगें तो वनमाळी
हो मनोभंग जीवास असूया जाळी
भ्रम भ्रमर गुंजती, मधुपलताकुंजांत
सांगते राधिका सखिला एकांतांत

[ **प्रवंध ५ वा** राग–गुर्जरी, ताल–रूपक ]

सखये, माधव खेळत रास
आठवते गे हास्यवदन तें, करि माझा उपहास ॥ धृ० ॥

मधुराधरिं धरि मोहन बासरि–ऐक सरसरसवंती
चलित नयन, मन मिलिति कपोलीं नाचत कुंडलकांती
भोगित मी वनवास ॥ १ ॥

केश कुरल वलयांकित, खोवित मोरपिसे शिरिं शोभे
मेघःश्यामल रंगसंगी इंद्रधनूवर शोभे
दावित रंगविलास ॥ २ ॥

गोळणि गौर नितंबवती, मुखचुंबित मोहक हासे
रक्ताधरिं मधुस्मित पल्लविता आठविते उल्हासें
जाळित या जीवास ॥ ३ ॥

करचरणांतील मणीभूषणें किरणप्रभा तम जाळी
पुलकित युवती तनुभुजबंधा कवळि हसत वनमाळी
करिती तिमिर निरास ॥ ४ ॥

चंद्रनील नवजलदपटावर, चंदन तिलक ललाटीं
उभार उरोज चुरी हरि शौर्यें निर्दय हृदयकपाटीं
दावित चौर्यविलास ॥ ५ ॥

मकर कुंडलें मंणिमय गालीं तेजतिमिर करि लीला
पीतांबर नेसला सावळा, सुरमुनि होती गोळा
करिती सतत निवास ॥ ६ ॥

कदंब तरु तळवटीं सुशोभित शाम हरित भय कलिषें
नयनकटाक्ष मदन शरसज्जित विंधित मन रमणींचे
नाचे हृदयामधली आस ॥ ७ ॥



अनुक्रमणिका

कवि जयदेव रचित अतिसुंदर मधुरिपु मोहन छंदा
पुण्यवता अनुरूप रूप जें, स्मरता पदारविंदा
मनोभृंग घे ध्यास ॥ ८ ॥

( प्रबंध ५ वा समाप्त )

मनमोहन माझा ग यदुराय
ध्यानिं मनीं या नयनीं स्वप्नीं
पाहत मी गुणिराय ॥

गणति न अवगुण, दोष तयाचे
छळ तोषविती काय ॥ १ ॥

रमवित रमता अन्य युवतिशी
प्रिय तरि मज निरुपाय ॥ २ ॥

स्मरहत मन हें स्मरतें, झुरतें
नीज उडुनिया जाय ॥ ३ ॥

काय करूं मी, कसें आवरूं
धांव घेति हे पाय ॥ ४ ॥

* * *

[ प्रबंध ६ वा. मालव राग, एकताल. ]

मधुकेशिमथन मज भेटवि गे
हा मदन छळतसे मजसि वियोगें
जाई सखे वेगें ॥ धृ ॥

निशावसानी निबिड निकुंजीं, नितांत रमवित कांता
वसंत खेळे हसती डोळे आतुर मन एकांता
दिशिं दिशिं शोधित जा गे ॥ १ ॥

पहिलीवहिली भेट प्रियाची, भीत लाजरी बाला
बोलुनि मंजुल, सैल करील दुकूल, मला अनुकूला
अनावृत्त उत्संगें ॥ २ ॥

रचिली कोमल शेज फुलांची शयनावरती निजले
कुच कवळित आलिंगन चुंबन मधुररसांनी भिजलें
प्राशिता सुधा सानुरागें ॥ ३ ॥

मदधुंदीनें मिटति पापणी आळसलेले डोळे
अंग अंग रोमांचित होई रतिरंगीं हिंदोळे
रमता रतिरमणासंगें ॥ ४ ॥

कुस्करली ग फुलें कोवळीं विस्कटली ग वेणी
कुंहु कुंहु कोकिल करि तरि कोरित उरीं नखांची लेणीं
टचटचली पीन कुचाग्रें ॥ ५ ॥

रुणझुण पैंजण करि मणिरशना किणकिण कटि कंपातें
सुरतरंगसरता कचकर्षुनि करील चुंबन दानें
कपोला केश सावरी मागे ॥ ६ ॥

रतिलीलेनें शिणली काया परि तो रसरंगेला
मदनदमन मधुसूदन कधिं गे पाहिन छिनिमिनि डोला
ही आस जिवा लागे ॥ ७ ॥

हावभावयुत रतिश्रृंगारा सखिते सांगत राधा
श्रीजयदेव कवी विरचित या मधुरगीतरसबंधा
रंगवी भावचित्र रंगें ॥ ८ ॥

( प्रबंध ६ वा समाप्त )

गळे करांतुनि पावा बघुनी मला लाजवंतीला
स्वेद सदन स्मित हास्यवदन तो दाखवि राजसलीला
नेत्रपल्लवी संकेतानें खुणावीत भ्रूभंग
व्रजललनाते जाया तिथुनी सांगतसे श्रीरंग
सुमनांतरिच्या मधुर मरंदा भुलला भाव मिलिंद
पाहिन कधि आनंदकंद हा भक्तसखा गोविंद

* * *

विरहताप दे अशोक शोकाकुल करिति लता
छळतो गे मन माझें बहर तयांचा फुलता
सर सन्निध उद्यानीं कुसुमगंध येई
शीत मंद गंधवाह जाळितसे बाई
मधुपांचा गुंजारव आम्रमंजिरी भंवतीं
सुखवी ना मजसि सखे, प्राण विकल होई

* * *

थरथरते खालीवर ती कमान भिवयांची
पापणिची हालचाल, चोरभेट नयनांची
अधरावरलें हासूं चांदणेच ओघळलें
गालावर मोहरले चंद्राचें गोड खळे
उंचाविति गौर भुजा उगा न कोठल्या मिषें
उभार कंचुकीतला उरोज आंतला दिसे
उंचावुनि बाहुमूल गोड अंगमोड ती
पीत गौर चौर युग्म रम्य वर्तुळाकृति

\+ \+ \+

कामसुंदरा रमवी मदयंती व्रजबाला
राधेविण कोण परी भुलवी गे व्रिजलाला
रतिलालस युवतींनी वेढियले कृष्णप्रिया
क्लेश हरो केशव तो, सुखवो नित जनहृदया

—×—

अक्लेश केशव द्वितीय [illegible] समाप्त









# सिंहाचा मुखवटा



(एक वेगडी मुखवटा)

विनोद-रहस्य-उपहास आणि असेंच कांहीं कांहीं' लिहिणाऱ्या श्री.. उमाकांत ठोमऱ्यांची पहिलीवहिली कादंबरी अनुवादित असणें प्राप्तच होतें. श्री. ठोमऱ्यांनीं संपादकीय लेखनाव्यतिरिक्त इतर पुष्कळसें स्वतंत्र लेखन केलेलें आहे. "गाडगीळ, गोखले इत्यादींनीं नवी मराठी कथा लिहावयाला सुरवात केली त्या काळांत ज्यांचें कथालेखन बहरलें त्यांत श्री. ठोमरे यांचें नांव अग्रभागीं घ्यावें लागेल." असें खुद्द त्यांच्या. 'कानफाट्या'चें मलपृष्ठच सांगतें. त्यांच्या एकदोन कथा-संग्रहांत उपरोक्त उक्तीची साक्ष पटते न पटते तोंच ठोमऱ्यांनीं स्वतंत्र लेखन जवळजवळ सोडून दिलें आणि स्वैर वाचनाच्या नादानें ते स्वैर रूपांतराकडे वळले. त्यांचे 'रंगरूप' व 'कानफाट्या' ह्या दोन संग्रहांनीं त्यांचा रूपांतरकारांचा पिंड घडविला आणि घट्टविला.

'सिंहांचा मुखवटा' ह्या A. T. W. Simeons च्या 'The Mask of a Lion' ह्या कादंबरीचें रूपांतर करण्याची जबाबदारी विदर्भ महारोगी सेवा मंडळानें श्री. ठोमऱ्यांवर टाकली ह्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांच्या सुरस व सरस अनुवादपद्धतीचा झालेला गाजावाजा हेंच असावें. ठोमरे 'रेडीमेड' कथानकाचें 'आऊटफिटींग' किती उत्कृष्ट व बेमालुमपणें करूं शकतात ह्याची साक्ष त्यांच्या अनुवादित कथासंग्रहांतील अनेक गोष्टी देऊं शकतील आणि म्हणून ठोमऱ्यांची ही निवड योग्यच होती असें म्हणण्याइतकी त्यांची वाङ्मयीन पुण्याई समर्थ होती. 'मा फलेषु कदाचन' ह्या अपेक्षेनें वागण्याची वृत्ति आजच्या साहित्यिकांत क्वचितच आढळते. पण ठोमरे हे मात्र असे अपवादात्मक कथाकार आहेत कीं ज्यांना आपल्या लेखनापासून क्वचित् 'किंचित् द्रव्य' प्राप्त झालें असेल. स्नेहासाठी, स्नेह्यासाठी आणि हौसेनें गेली कित्येक वर्षें त्यांनीं असें निस्वार्थी लेखन केलेलें आहे आणि तेंही ह्या कृतींवर आणि वृत्तीवर झालेल्या टीकांची तमा न बाळगतां हे विशेष आहे. प्रस्तुत अनुवाद हातीं घेण्यांत त्यांची सहृदय सेवावृत्ति कारणीभूत झाली असेल असें मानलें तर तें असत्य ठरणार नाहीं.

चांगल्या कथानकाचा अनुवाद करणं हा खरी सुळावरची पोळी आहे. परकीय वातावरण, वेषभूषा व स्वभावाच्या लकबी अनुवादांत तितक्याच समर्थपणें उतरवणें ही गोष्ट साधीसुधी नाहीं. त्याला पडणारे परिश्रम ठोमऱ्यांच्या ठायीं आहेत म्हणून तर त्यांचे अनुवाद सरस ठरले आहेत. सायबाचा झावबा व छोकरीचा सोकरी करण्यांत ते इतके वाकबगार आहेत कीं चोरबाजारांतल्या त्यांच्या चिजेचें रोगण खरवडून आंतला जुनाट गाभा चाणाक्ष गिऱ्हाइकालादेखील पारखणें कठीण जावें.

ज्या इंग्रजी कादंबरीचा ठोमऱ्यांनीं अनुवाद केला आहे तीं मुळांतच दोनशें चाळीस पृष्ठांची आहे आणि म्हणूनच शब्दशः रूपांतर करणें हें मराठी प्रकाशनाच्या आंवाक्याबाहेरचें आहे हें जाणून त्यांनीं प्रथमतः संक्षेपाचें स्वातंत्र्य मागून घेतलें. आणि ठोमऱ्यांची कार्यक्षमता जाणून प्रकाशकांनीं तें दिलेंही. प्रस्तुत अनुवादाच्या 'ऋणभारांत' ठोमऱ्यांनीं आपली भूमिका स्पष्ट केली आहे. "कादंबरीच्या गाभ्याला धक्का लागणार नाहीं, मूळ आराखडा विस्कटणार नाहीं, लेखकाला अन्याय होणार नाहीं, अशा प्रकारें कांहीं वर्णनांत आणि घटना-प्रसंगांत काटछाट करण्याचें स्वातंत्र्य जसें मला प्रकाशकांनीं दिलें तसेंच संस्कृतिभिन्नतेमुळें लोकजीवनाच्या तपशीलांत मूळ लेखक जिथें तोकडा पडला तिथें तें रूपांतरांत यथातथ्य उभे करण्याचेंहि स्वातंत्र्य मला त्यांनीं दिलें."

कुष्ठ रोग्यांच्या खडतर जीवनाची भेसूरता हा विषय मूळ कादंबरींत लेखकानें इतका स्पष्टपणें, यथार्थपणें व परिणामकारकपणें हाताळला आहे कीं वाङ्मय व जीवन ह्यांच्या स्पर्शास्पर्शतेच्या तात्विक चर्चा करणाऱ्या वावदूक टीकाकारांनीं ती कादंबरी वाचली तर त्यांच्यावरही इष्ट परिणाम होईल इतकें सामर्थ्य ह्या पाश्चात्य लेखकाच्या सहृदय शैलींत आहे. सामान्य पण सुखी माणसाच्या जीवनांत कुष्ठरोगाच्या प्रादुर्भावानें कसें विष कालवलें जातें व त्यामुळें त्याला कुटुंब, समाज व स्नेह कसा पारखा होतो व पदोपदीं कसा अपमान सहन करावा लागून, कुसंगति व स्वैराचारांत खितपत पडण्याची कशी पाळी येते ह्याचें परिणामकारक चित्र

(पान ५४ वर चालू)

शां. शं. रेंगे



अनुक्रमणिका

# को य री





पावसाची भुरभुर सुरूं झाली तशी सुहासिनीनें खिडकी बंद केली व पलंगावर उठून बसून नवऱ्याला पत्र लिहिण्यांस सुरवात केली.

परवां तुमचा निरोप घेऊन माहेरी निघाले, तें ठरविल्याप्रमाणें वाटेस इथें उतरले. आणिक दोन दिवस थांबून मग पुढें निघणार आहे. प्रकृतीत तोळामासाहि बिघाड नाही. जास्त जड वाटतंय मात्र. माहेरी पोचल्यावर डॉक्टरबाईंना दाखवणार आहेच...

बंद खिडकीच्या तावदानावर पावसाच्या थेंबांनीं तोरण केलं अन् लेखन थांबवून सुहासिनी खिडकीबाहेर पाहूं लागली. वळीवाच्या सरी कोसळत असतांना नवरा तिच्या केसावरून हलकेच हात फिरवीत होता. बाळंतपणासाठी ती माहेरी गेल्यावर एकटं राहावं लागणार म्हणून व्याकूळ झाला होता. "कसें ग एकट्यानं दिवस काढायचे !—जातांना तूं सगळं नीट करून जाते आहेस. आचारी आहे, आहे आहे...पण...पण...' तो उदास होऊन म्हणत होता. 'मी लवकर येईन ना...तुमच्यासाठीं...' ती भारावलेले शब्द आवर्जून उच्चारीत होती...

सुहासिनीचा कंठ दाटून आला. सगळी व्यवस्था केली आहे खरी, पण आपल्या मागें घराची परवडच होणार. नवऱ्याला एकटं वाटणार, त्याची आबाळ होणार...सुहासिनीचा चेहेरा वेदनेनें साकळून गेला. असंच उठावं नि परत घरीं जावं असं वाटलं. नको तें बाळंतपण नि नको तें माहेर !

जराशानें ती नकळत लिहूं लागली : 'मी आल्येय खरी, पण माझं सगळं मन तुमच्याभोंवती घुटमळतंय. ह्या वेळेला तुमच्या जवळ असावं असं सारखं वाटतंय. विचित्र वाटेल, पण मुलासाठीं आसुसलेलं, मातृपदासाठीं ओढ घेणारं माझं मन आतां एकदम थिटल्यासारखं झालंय्. कांहीं नको—फक्त तुमचा सहवास, तुमची काळजी......

शेजारच्या खोलींतून खोकल्याची उबळ ऐकूं आली आणि सुहासिनीचं पेन अडखळलं. ती लिहीत होती अन् नवरा बाथरूममध्यें टॉवेल विसरला, ऑफिसांत जातांना सुपारीचं खांड शोधीत बसला, कुठलीतरी कोटी सांगण्यासाठीं सैपाकघरांत धांवला, मध्यरात्री जागा झाला—अनेक दृश्यें तिच्या डोळ्यापुढून सरकत होती. पण आतां सग-





अनुक्रमणिका

*' भावे–गोखले–गाडगीळ आदि कथा लेखक संपलेले आहेत. '—एक टीकाकार.*

*' मराठी कथा आज थांबलेली आहे. चांगली कथा मिळेनाशी झाली आहे. '—एक संपादक.*

*जुन्या-नव्या कथालेखकांच्या ' चांगल्या ' कथा प्रसिद्ध करण्याची दीपावलीची परंपरा मात्र चालूं आहे. अरविंद गोखले यांचे दीपावलींत क्रमशः प्रसिद्ध झालेले कथागुच्छ : तिपेडी, झोका, कवडसे आणि आतां ही दोन आगळ्या कथांची ' कोयरी '*

---

ळंच थांबलं. खोकला कानांत भरूं लागला. मामंजींची जर्जर मूर्ति डोळ्यासमोर आली. पॅड बाजूला टाकून सुहासिनी बंद दाराकडे पहात बसली. एकदां वाटलं, जावं नि मामंजींच्या जवळ उभं राहावं. त्यांना औषध विचारावं. पण ती उठली नाहीं. शरीर जड झालं होतं. अन् पुढ्यांत पॅड फडफडत होतं.

थकलेल्या शरीराच्या सांपळ्यांत गुदमरून बसलेला दमा पावसाच्या वासानें गुरगुरूं लागला होता. तक्याचा नि तस्ताचा आधार घेऊन तात्या छातीतला ठेका सावरीत होते. सगळं जग परकं झालं होतं. एवढं मोठं घर—पण त्याला उजाडपणा आला होता. एका वारकऱ्या-खेरीज त्या वाड्यांत कुणी नव्हतं. वारकरी—अन् आतां चार दिवसासाठी आलेली सून.

आतां धड्याळाचा लंबकच अविरत ठसकूं लागला आणि सुहासिनी भानावर आली:...आणिक चार दिवस तुमचा सहवास मिळाला असता. पण उगाचच मामंजींना भेटून पुढें जायची कल्पना काढलीत तुम्ही. बाळंतपणानंतर, बारशांत ते भेटले असते की ! मला ह्या वाड्यांत राहायचं भय वाटतं. एवढं मोठं घर, नि तात्या त्यांत एकटे भुतासारखे राहातात. मुलाकडे नि मुलीकडे दिवस काढायला काय हरकत होती त्यांना ? हट्टी. दम्यानं, वार्धक्यानं, जेमतेम जगणारे. खोलीबाहेरहि पडत नाहींत. तक्याशी टेकून असतात. भिंतीवरच्या सासूबाईंच्या फोटोकडे पहातात. अपरात्री उठून एकतारी वाजवत बसतात...

अक्षरा अक्षरातून एकतारींचा सूर झरूं लागला अन् सुहासिनी अस्वस्थ झाली. हॉस्पिटलमध्यें जाईपर्यंत नवऱ्याला रोज एक पत्र लिहायचं तिनें कबूल केलेलं होतं. तीनचार महिने तो एकटा राहणार; निदान पत्रानें तरी...पण हे पहिलंच पत्र पुरं होईना. माहेरी माणसांची व औषधांची वर्दळ—त्यांत लिहिणं अशक्य होईल अशी तिची कल्पना होती. पण इथें एकांत असून, भरपूर वेळ असून पॅडचं एक पानहि भरेना.

पेन मिटवून ती उठली व आरशापुढें उभी राहिली. स्वतःचा चेहरा आरशांत दिसण्याआधीं लोटून घेतलेलं दार तिला दिसलं अन् तिची नजर दाराच्या फटींतून शेजारच्या खोलीत जायला धडपडूं लागली. मामंजींसाठीं म्हणून इथे थांबलो, पण आल्यावर नमस्कार करण्यापलिकडे अन् मोजके दोन शब्द बोलण्यापलिकडे आपण कांहींच केलं नाही. हे दोन दिवस शेजारणीकडे बसण्यांत नि पलंगा-वर लोळण्यांत घालवले; असाच आणिक एक दिवस घालवून...

सुहासिनीनें आरशाकडे पाठ फिरवली व ती सरळ दाराच्या फळ्यांकडे टक लावूं लागली. पोटांत फिरूं लागलं व खोकल्याचा आवाज ऐकूं यावा म्हणून ती अधीरी झाली. आंत सगळं शांत होतं. एवढ्या वाड्यांत दुसरं कुणी नाही. फक्त तात्या ! मुलगी सासरी, मुलगा चाकरीच्या गांवीं, पत्नी तर ऐन संसारातून अंतर्धान पावलेली...

न पाहिलेल्या सासूची आकृति डोळ्यापुढें आणायचा सुहासिनीनें आटापिटा केला. फोटोतला चेहरा; तशाच नाकाडोळ्यांचा तिचा नवरा. कशा असतील सासूबाई ? आता असत्या तर ?

मग आतून आवाज आला. सुहासिनी दचकली व जीवघेणा खोकला सुरूं होईल म्हणून कानशीलं दाबूं लागली. पण आवाज झाला एकतारी सरकवल्याचा. लगोलग तारा छेडल्या गेल्या व कापरा झंकार सर्वत्र भरूं लागला.

एकतारीचा अविरत स्वर ऐकतांना सुहासिनी सगळं विसरली व जरावेळ आरशाला ओठंगून उभी राहिली. पोटातलं बाळ हलकेच हालचाल करूं लागलं. बाहेरचा पाऊस अनावर झाला, तिरक्या धारा खिडकीवर सरसरूं लागल्या. पत्नीच्या विरहानें झालेल्या उदास, अस्वस्थ, एकाकी नवऱ्याच्या मूर्तिऐवजी सासऱ्याची आकृति तिच्या डोळ्यापुढें तरळूं लागली. खंगलेली. आधारहीन, दीन. एकतारी आळवीत जुनाट वाड्यात एकटी साद घालणारी...

तात्यांनी एकतारी ठेवून दिली कीं सुहासिनीच्या भरल्या हृदयात सूर शिरेनासे झाले-कोण जाणे. पण सुहासिनीला कांहीं ऐकूं येईनासं झालं. सगळं पोकळ वाटूं लागलं. बंद दाराकडे जाण्याऐवजी ती खिडकीशी गेली. तावदान जरा उघडतांच गार वाऱ्याची ओलीचिंब झुळूक तिच्या केसांवर व गालावर शिडकली. ती शहारली व मग सुखावून गेली. वळीवाचा वास तिच्या वृत्ती भरून टाकूं लागला. नवऱ्याची परत आठवण झाली. अन् कधी नाही ती त्याची काळजी वाटूं लागली. विलक्षण काळजी. आजवरं कधी न बोचलेली, वेडी-बागडी पण विश्वव्यापी चिंता.

सुहासिनीचे डोळे भरून आले. पावसाचे तुषार तिच्या अंगावरून पलंगाकडे झेपावत होते. फडफडणाऱ्या पॅडकडे पहात सुहासिनी पत्रातला मजकूर मनाशी घोळवीत होती :...गर्भारपणामुळें अनेक कल्पना मी करीत बसते, कांहींबाही विचार करीत राहते—असं तुम्ही म्हणालां होतात. पण तरीहि लिहिते कीं कधीं नाही ती तुमची काळजी मला वाटते आहे. मी खरं म्हणजे माझीच काळजी वहायची. बाळंत-पणाबद्दल, बाळाबद्दल कल्पना करीत बसायचं. पहिली खेप, अन् तीसुद्धां...पण वाटतं हे कांहीं नको. तुमच्यासाठीं; नि–नि आपल्या तात्यांसाठीं...

अ र विं द गों ख ले

सुहासिनी दचकली. टपोरे अश्रु डोळ्यांतून खाली घसरले. पत्राचे कागद पावसांत थर-थरत होते. सगळंच जलमय झालं होतं. राजा-






राणीचा संसार रंगावा म्हणून तात्या इथें एकटे राहूं लागले. सुहासिनीला तेव्हां सुटल्यासारखं वाटलं होतं. विधुर सासरा असला तरी नव्या संसारांत कशाला त्याचा तक्क्या नि तस्त ?

त्या मोठ्या वाड्यांत सुहासिनीला आतां आपल्या घरकुलाची लाज वाटूं लागली. तात्यांनी दूर राहावं म्हणून जणूं तें दार लोटून घेतलं होतं. तात्यांना तिनें काय मानलं होतं ? सासरा, नवऱ्याचे वडील, घरांतलं एक संपून जाणारं माणूस ?...एक वृद्ध, विधुर...? छे, छे . ह्यापेक्षां ते कुणी तरी अधिक नव्हते का ? त्यांना अधिक जपायला, जवळ करायला नको होतं का ?

...तूं हवास, तुझ्या काळजीत जीव घोळवत राहावा...पण खरी सोबत हवी आहे तात्यांना. त्यांची कुणी तरी काळजी घ्यायला हवी रे. स्त्रीची, मातृभावनेची जास्त जरूर आहे त्यांना...ह्या क्षणीं तरी वाटतंय कीं बाळापेक्षां, नवऱ्यापेक्षां इथें, एकाकी सासऱ्याजवळ राहावं. त्यांच्या खस्ता काढाव्यात, आयुष्याच्या अखेरीस आलेल्या ह्या पित्यासमान जीवाला जरा ममतेचा स्त्रीमनाचा आधार द्यावा...

ओल्या झालेल्या कागदावर हें सारं उतरवावं असं सुहासिनीला फार वाटलं. पण तिनें पेन उचललं नाही. नवऱ्याला पत्र टाकायच्या डाकेची वेळ झाली होती. पोटातहि किंचित्शी कळ येत होती. तशीच ती बंद दाराशी गेली व फटीतून तात्यांच्याकडे पाहूं लागली. तात्यांच्या विझत चाललेल्या डोळ्यापुढें काय दिसत होतं, कोण जाणे. पण त्यांच्या सुरकुतल्या लटपटत्या चेहेऱ्यावर कारुण्य ठिपकलं होतं. मुलगा, मुलगी, सून, जावई, घर, पैसा—सारं होतं; पण तस्त, तक्क्या जीर्ण तसवीरी नि नित्य नवीं औषधं ह्यांच्याच आधारानें ते जगत होते. दोन तपापूर्वी पत्नी वारली—व तेव्हापासून एकाकी झालेला तो जीव अखेरचे दिवस एकट्यानं चाचपडत होता.

आणि त्यांच्या एकुलत्या एक मुलाची पत्नी, त्यांच्या नातवाची आई, त्यानी ह्या वाड्यात आणलेली लक्ष्मी उंबरठ्यापलिकडून त्यांचं एकाकी उजाड जीवन व्याकूळ मनानें पहात उभी होती.

● ● ●



## २

निरोप धाडला; मग कळविल्याप्रमाणें वेळेवर पोचलो—पण ती स्त्री कांहीं माझी वाट पहात नव्हती. भेटीबद्दल विसरली नव्हती पण माझ्या येण्याबद्दल बेफिकीर होती. दोनचार बाया जमवून मेतकूट मसाले कुटण्यांत गर्क झालेली होती.

"मी...मी भय्या सोनावणे. पीएच्. डी. साठी अभ्यास करतो आहे—आपल्या यजमानांच्या नाटकांचा..."

बायकांच्या कोंडाळ्यातून ती पुढें झाली. पुढें झाली म्हणून तरी अक्षर वाङ्मय रचणाऱ्या साहित्यिकाची तीच पत्नी हें मी ओळखलं. त्या थोर, दिवंगत लेखकाच्या त्या विधवा अर्धांगीकडे आदरानें व कुतुहलानें बघूं लागलो.

तिच्या खोल, निस्तेज डोळ्यांत काय भाव होते ?—तुच्छता तटस्थता...? मी आलो हे तिला फारसं आवडलं नाही असं आपलं मला वाटलं. तिच्या मागोमाग मी सोप्यावरून शेजारच्या लांबट खोलीत गेलो. बॅग बाजूला ठेवून उंबरठ्याजवळच्या चटईवर बसलो.

हीच त्या लेखकाची बैठकीची जागा. इथेच बसून त्यानें कादंबऱ्या व नाटकं लिहिली. एकामागून एक, एकापेक्षां एक सरस कलाकृति निर्माण केल्या. साहित्यांत एक नवी क्रांति केली. गरिबीत, त्या गांवढ्यांत उपेक्षित आयुष्य कंठून तो वारला—आणि आज दोन तपानंतर त्याच्या साहित्याची थोरवी पारखली गेली. त्याच्या लेखनानें एक नवी खळबळ सुरू झाली. कादंबऱ्यांच्या नव्या आवृत्त्या, नाटकांचे प्रयोग, लेखनावरची भाष्ये, चर्चा...

थिसीस लिहिणारं माझं मन खोलीभर भिरभिरूं लागलं. वीसएक वर्षांपूर्वीचं वातावरण चितारूं लागलं. लेखकांच्या मैफली, अस्वस्थपणें फेऱ्या घालणारा लेखक, रात्री अपरात्री सुरू असलेलं लेखन, उपेक्षेमुळें उद्विग्न झालेला व प्रतिभेच्या उन्मेषानें फुलून गेलेला...

त्या स्त्रीनें पाण्याच्या माठावरच्या भांड्यांत करून ठेवलेल्या पन्ह्यांत पाणी घातलं व कप भरून माझ्यापुढें ठेवला. बाजूच्या भिंतीला ओठंगून ती बसली. मी भानावर आलो वै कप हातात घेऊन बसून राहिलो. त्या काळांत, वीस वर्षांमागें ही स्त्री तरुण असेल... वयानें फार मोठ्या असलेल्या पुरुषाशी विवाह झाला, अन् संसारसुख सारं पांच सहा वर्षे लाभलं...ती सहा वर्षे कशी गेली असतील ? गरिबीशी झगडण्यांत ? तिशी उलटलेल्या तऱ्हेवाईक नवऱ्याशी जुळवून घेण्यांत ? त्याच्या प्रतिभा विलासांत धुंद होऊन राहण्यांत ?...

"कसलं काम आहे आपलं ?—" तिनें रुक्षपणें म्हटलं.

मी पन्हं पिऊन कप ठेवला व तोंड पुसून म्हटलं,

"माझ्या अभ्यासांत मी त्यांच्यावर एक वेगळा लेख लिहीत आहे. चरित्रविषयक. त्यांच्यासंबंधी कांहीं आठवणी सांगितल्यात तर..."

"वीस वर्षांपूर्वीच्या गोष्टी—आता कसल्या आल्याहेत आठवणी..." त्या स्त्रीचा आवाज अधिक अलिप्तग्रस्त झाला. कांहीं कुरुप स्मृतींची बोच तिच्या काळजांत आली असा मी तर्क केला.

संभाषण वाढणार नाही हें मी ताडलं म्हणूनच बळेच म्हटलं,

"परवां एक नट भेटले होते. त्यांच्या बहुतेक नाटकांतून त्यावेळी कामं केलेले...ते सांगत होते की नाटक मंडळीच्या बिऱ्हाडी लेखक आले की जेवतांना मध्येच कविता गुणगुणूं लागत. अन् मग अनिवार होऊन खरकट्या हातांतच टाक धरून लिहूं लागत..."

(पान १८ वर चालू)








फार फार पूर्वी, भारतांतील गणितज्ञांनीं शून्याचा उपयोग करण्याची कल्पना काढली आणि त्याची परिणति आकड्यांचा वापर करण्यांत झाली — गणतीच्या कलेंत ही एक क्रांतीच होती. मानवी जीवनांत मोज, माप व तोल यांना अत्यंत महत्वाचें स्थान आहे. सरकारांनीं आपलीं अंदाजपत्रकें तयार करावयास हवीं. व्यापारी संस्थांना आपल्या कामगिरीचा आढावा घ्यावयास हवा; इतकेंच काय, व्यक्तीनेंहि आपली मिळकत व खर्च यांवर बारकाईनें लक्ष ठेवावयास हवें. हें सर्व काम, शून्यावर आधारलेल्या आंकडेशास्त्राच्या सहाय्यानेंच केलें जातें. आंकडेशास्त्राविना, राष्ट्रीय अथवा जागतिक प्रमाणावर व्यापार-उदीम करणें किंवा आर्थिक पुनर्रचनेच्या महत्वाकांक्षी योजना कार्यवाहींत आणणें, अशक्य जरी नसलें तरी, कठीण खासच जाईल. आंकडेशास्त्रास धन्यवाद —



आंकड्यांचा उपयोग करूनच दिसून आलें कीं १९५९ सालीं स्टॅण्डर्ड व्हॅक्यूम कंपनीला तेलाचें शुद्धीकरण व खरेदी-विक्री यांच्या व्यवहारांतून, कर भरल्यावर उरलेला एकूण नफा १ कोटी २० लक्ष रुपये झाला. हा नफा गुंतविलेल्या भांडवलावर ३ टक्के या हिशोबानें पडला. तसेंच, स्टॅनव्हॅकनें कर व जकात म्हणून २६ कोटी ८७ लक्ष रुपये भरले. ही रक्कम स्टॅनव्हॅकच्या निव्वळ उत्पन्नाच्या जवळ जवळ २२ पट येवढी झाली; अथवा स्टॅनव्हॅकनें प्रत्येक गॅलनच्या विक्रीवर अदमासें १.४ नये पैसे या हिशोबानें नफा मिळविला. त्याचप्रमाणें, शून्यावर आधारलेल्या आंकडेशास्त्राच्या सहाय्यानेंच हें जाहीर करणेंहि आम्हांला शक्य झालें कीं गेल्या वर्षांत स्टॅंडर्ड-व्हॅक्यूमनें यंत्रसामुग्रींत व खरेदी-विक्रीच्या साधनांत नवीन भर घालण्यावर ८९ लक्ष रुपये, तेल-शुद्धीकरणाच्या कामगिरीवर १ कोटी २ लक्ष रुपये आणि पश्चिम बंगालमध्यें तेलाचा शोध लावण्यावर १ कोटी ६ लक्ष रुपये खर्च केले.



**स्टॅनव्हॅक — देशाच्या प्रगतींत सहभागी आहे**

स्टॅण्डर्ड व्हॅक्यूम ऑइल कंपनी यू. एस. ए. मध्यें संस्थापित. सदस्यांची जबाबदारी मर्यादित आहे

*खरोखर लडाखचा आठ हजार चौरस मैल मुलुख चीननें केव्हां गिळला हें भारत सरकारला कळूंच शकलें नाहीं. ही या सरकारची केव्हढी मोठी 'नादानी' म्हणावी लागेल ! पण ही 'नादानी' आहे हें कबूल करूनहि त्या नादानीचें योग्य कारण समजून घेणें व महत्त्वमापन करणें जरूर आहे.*

# चीनचें आक्रमण व

चीननें लडाखवर आक्रमण केलें ही बातमी एक वर्षापूर्वी जाहीर झाल्यापासून भारताच्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय राजकारणाचा रंग सर्वस्वीं बदलून गेला असून गेलीं तीसहून अधिक वर्षे तेजःपुंज व्यक्तित्वानें तळपणाऱ्या नेहरूंवर थोडीशी केतूची छाया पडली आहे. भारत स्वतंत्र होण्यापूर्वी गांधीजींच्या अमदानींतहि पं. नेहरू हेच देशाचे व कॉंग्रेसचे स्फूर्तिदाते नेते म्हणून गणले जात असत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या गेल्य १३ वर्षांत ते कॉंग्रेसचे सर्वश्रेष्ठ नेते, भारताचे पंतप्रधान आणि देशांतील सर्वच पक्षांवर व जनतेवर आपल्या प्रभावी व्यक्तिमत्वानें छाप टाकणारे राष्ट्रीय पुढारी म्हणून गणले गेले आहेत. गेल्या १३ वर्षांत कम्युनिष्ट राष्ट्रें सोडलीं तर आशियांतील राष्ट्रांत भारताइतकी आर्थिक प्रगति इतर कोठेंहि झाली नाहीं. आणि आशियांतील राष्ट्रांत भारताइतकें राजकीय स्थैर्यहि कुठें नांदलें नाहीं. भारताइतकी सुदृढ लोकशाही आशियांतील राष्ट्रांत दुसरीकडे कोठेंच आढळून आली नाहीं. या सर्व सुस्थितीचें व प्रगतीचें श्रेय या देशांतील सर्वांनीं व परराष्ट्रीयांनींहि पं. नेहरूंच्या व्यक्तिमत्वाला दिलें आहे. गेल्या १३ वर्षांत भारताची रणशक्ति जगांतील बड्या राष्ट्रांच्या मानानें बरीच दुबळी असतांहि पं. नेहरूंनी आंतरराष्ट्रीय राजकारणांत वेळोवेळीं जें मतप्रदर्शन केलें तें इतकें अचूक व मार्मिक ठरलें कीं, अनेकदां महायुद्धाच्या संभवापर्यंत आलेली परिस्थिति नेहरूंचें मार्गदर्शन स्वीकारल्यामुळें टळली अशी कबुली जगांतील कांहीं बड्या मुत्सद्यांनीं प्रत्यक्षअप्रत्यक्षपणें दिली असून नेहरूंच्या मताला हल्लीं इतकें मोठें मूल्य आलें आहे कीं नेहरूंच्या मनाचा कल आपल्याला अनुकूल असावा यासाठीं बलाढ्य भांडवलशाही राष्ट्रांपासून बलाढ्य कम्युनिस्ट राष्ट्रांपर्यंत सर्वजण दक्षता बाळगून आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीची वीस वर्षे आणि त्यानंतरचीं तेरा वर्षे नेहरूंच्या कीर्तीचा फुगा मोठा मोठा होत आकाशांत वरवर चालला असतां आणि साऱ्या जगाच्या कौतुकाचा, प्रशंसेचा अथवा मत्सराचा विषय झाला असतां चीननें लडाख गिळून टाकल्याची बातमी प्रसिद्ध झाल्यापासून त्या फुग्याला अचानक टाचणी लागली असून त्यांतील हवा कमी होऊं लागली आहे. हा फुगा बारीक होत चालला आहे. ज्यांना त्यांचा मत्सर वाटला त्यांना आनंदाच्या उकळ्या येत आहेत. ज्यांना त्यांच्या कीर्तीबद्दल आनंद झाला ते हिरमुसले आहेत. पण देशाची चिंता वाहणाऱ्या सर्वांची चिंता यामुळें अधिक वाढली आहे.

\+ + +

मला या लडाख प्रकरणामुळें, जसें दुःख झालें आहे तसा थोडासा कुत्सित आनंदहि होत आहे. आज जगांतील थोर थोर मुत्सद्यांत पं. नेहरूंच्याइतका दूरदर्शी आणि क्षितिजाखालींहि पाहून राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिस्थिति अचूक हेरणारा मुत्सद्दी नाहींच अशी माझी फार दिवसांची खात्री झालेली आहे. मागासलेल्या राष्ट्रांत लोकशाही भूमिकेवर नियोजनपूर्वक आर्थिक प्रगति करण्याचा पं. नेहरूंच्याखेरीज या देशांत झाला नसता, (व आज जगांत असा इतरत्र कोठेंहि होत नाहीं,) याबद्दल माझी जुनीपुराणी खात्री असून त्याबद्दल माझ्यासारख्या अनेकांना अभिमानहि वाटतो. पं. नेहरूंच्या प्रतिकूल टीकाकारांत असमंजस व मत्सरी टीकाकारांचाच भरणा मोठा असल्यामुळें आणि नेहरूंच्याबद्दल अनुकूल बोलणाऱ्यांत विभूतिपूजक आणि खुशामते यांचाच भरणा फार असल्यामुळें नेहरूंच्या राजकारणाची नीटशी गुणदोषचिकित्सा हल्लींच्या स्थितींत होऊं शकलेली नाहीं हा सद्यःस्थितींतला मोठा दोष होय. ही चिकित्सा होण्याला या लडाख प्रकरणानें आतां बरीचशी मदत होईल हें माझ्या कुत्सित आनंदाचें कारण आहे. याचा अर्थ वर उल्लेखिलेल्या प्रकारचे नेहरूंचे अनुकूल व प्रतिकूल टीकाकार नेहरूंच्या गुणदोषांची योग्य चिकित्सा करतील असें मी मानतों असा नव्हे. स्वतः नेहरूंच इतर कोणाहिपेक्षां आत्मनिरीक्षणपूर्वक स्वतःचे गुणदोष समजून घेण्यांत दर्दी आहेत. त्यांना या लडाख प्रकरणानें आत्मनिरीक्षणाची, विशेषतः आपले दोष निरखून पाहण्याची उत्तम

पां. वा. गाडगीळ











अनुक्रमणिका

# नेहरूंचें नेतृत्व



संधि मिळाली हें माझ्या आनंदाचें कारण आहे. गेल्या १३ वर्षांतील आंतरराष्ट्रीय राजकारणाचे त्यांचे अंदाज बरेच अचूक येत गेले त्यामुळें कदाचित् नेहरू थोडेसे गर्वभरानें वाहवले जात आहेत असा भास अनेकदां होत असे. चीनसंबंधानें ज्या ज्या वेळीं नेहरू बोलत त्या त्या वेळीं चीनच्या दरबारीं आपला जणुं कांहीं खास वशिला आहे असे ते बोलत असत. चीनला यूनोंत घेण्यासंबंधानें चीनबद्दल अति स्नेहभावाचा आव आणून नेहरूंनीं ज्री वेळीं अवेळीं लालचीनची 'वकीली', केली, लालचीनच्या अंतर्गत कारभारांत भांडवलशाही राष्ट्रांनीं हस्तक्षेप करूं नये म्हणून नेहरूंनीं जो गेल्या ११ वर्षांत जिवाचा आटापीट केला त्यामुळें नेहरू हे कम्युनिस्ट पक्षपाती आहेत व अमेरिकाद्वेष्टे आहेत असा आरोप त्यांनी आपणावर ओढवून घेतला. लालचीनची मनःस्थिति आणि लाल चीनमधील परिस्थिति आपणालाच इतर कुणाहीपेक्षां अधिक चांगली कळते असें नेहरू अनेकदां बोललेहि होते.

* * *

अशा परिस्थितींत लाल चीननें भारताच्या लडाखचा आठ हजार चौ. मैल मुलुख गिळला इतकेंच नव्हे तर एवढा हा प्रचंड मुलुख केव्हां गिळला याचा भारत सरकारला पत्ताहि लागला नाहीं असें नेहरूंच्या पार्लमेंटांतील निवेदनावरून साऱ्या जगाला कळून आलें असल्यामुळें नेहरूंना खजिल व्हावें लागलें आहे व हें थोडेसें बरेंच झालें. त्यांच्या आयुष्यांत त्यांना एवढा मोठा पराभव खावा लागलेला त्यांना अथवा इतरांना कोणालाहि माहीत नाहीं. लडाख चीननें भारताला नकळत खाऊन टाकला ही बातमी अमेरिकेंत प्रसिद्ध झाली तेव्हां तेथील बहुतेक वृत्तपत्रांनीं नेहरूंना कम्युनिस्टांच्या या विश्वासघाती वर्तनामुळें चांगली अद्दल घडली असें मत व्यक्त केलें आहे. एका मित्र मानलेल्या राष्ट्रानें विश्वासघातानें आक्रमण करून भारताचा आठ हजार चौ. मैल मुलुख मुकाट्यानें गिळून टाकला यामुळें नेहरूंना व भारताला शरमिंदे व्हावें लागलें आहे, इतकेंच नव्हे तर आक्रमण केलेल्या शत्रूला आपण मागें हटवूं शकत नाहीं इतका तो आज प्रबळ आहे व उद्यां आपल्या मानानें आपल्याहूनहि अधिक प्रबळ होणार आहे ही परिस्थिति खरोखर नामुष्कीची आहे. भारताचे राष्ट्रीय व्यवहार या लडाख प्रकरणानंतरहि पूर्वीसारखेच चाललेले आहेत आणि नेहरूंचें जागतिक राजकारणांतील वजन फारसें कमी झालेलें दिसत नाहीं. तरी पण नेहरूंच्या व देशाच्या मनाला चीनच्या आक्रमणानें झालेली अपमानाची जखम ही सतत यातना देत आहे व नवी नवी चिंता वाढवीत आहे यांत संशय नाहीं. पण ही फक्त अपमानाचीच जखम आहे, याहून भौतिक नुकसान या लडाख प्रकरणानें झालेलें नाहीं असें मला म्हणावयाचें आहे. ही एक आत्मनिरीक्षणाची संधि भारताला व नेहरूंना आली, नेहरूंचे नेतृत्व कोठें कमी पडत आहे हें समजून घेण्याची सक्ती भारताला व नेहरूंना मिळाली हा,—पण एवढाच, अर्थ सद्यःस्थितींत आहे हें मला येथें निक्षून सांगावयाचें आहे. खरोखर लडाखचा आठ हजार चौ. मैल मुलुख चीननें केव्हां गिळला हें भारत सरकारला कळूं शकलें नाहीं ही या सरकारची केवढी मोठी 'नादानी' म्हणावी लागेल! पण ही 'नादानी' आहे हें कबूल करूनहि त्या नादानीचें योग्य कारण समजून घेणें व महत्त्वमापन करणें जरूर आहे.

\+ \+ \+

लडाख कोठें आहे आणि कोणत्या परिस्थितींत आहे हा प्रश्न येथें अतिशय महत्त्वाचा आहे. काश्मीरच्या ईशान्य टोकास समुद्रसपाटीपासून सोळा हजार फूट उंचीवर लडाख हा प्रदेश आहे. श्रीनगरपासून तो २०० मैल तरी दूर आहे. पण नुसत्या मैलाच्या बाबतींत हें अंतर महत्त्वाचें नाहीं. तासाला ६५ मैल या वेगानें जाणारी मोटार अथवा जीप तीन तासांत हें अंतर सहज तोडूं शकेल. मुख्य गोष्ट १६ हजार फूट उंचीवर रक्त गोठण्या इतकी थंडी बाराहि महिने असते ही आहे. तसेंच लडाखमधील जो अक्साई-चीन प्रदेश चीननें गिळला आहे तो केंद्र मानून भारताच्या दिशेनें १०० मैलांची त्रिज्येचें, अंश वर्तुळ काढल्यास हा शंभरहि मैलांचा प्रदेश खोल दऱ्या, उंच उंच पर्वत, निबिड अरण्यें व











अनुक्रमणिका

दुर्गम नदीनाले यांनीं व्याप्त असा आहे. भारत स्वतंत्र झाल्याला तेरा वर्षे झालीं. पण त्याच्या पूर्वीच्या काळांत चीन इतका दुबळा होता कीं अडीच हजार मैल भारत-चीन सरहद्दीपासून चीनचें सरकार अथवा त्यांचें सैन्य शेंकडों मैलांत कधीं आलेंच नाहीं. या लडाख प्रदेशांत जवळजवळ कोणीहि राहत नाहीं, राहूं शकत नाहीं. तेथील आदिवासी लोक संख्येनें फार थोडे आणि अगदीं तुरळक तुरळक राहतात. बाहेरचे जग त्यांनीं कधीं पाहिलेलें नाहीं. गेल्या १३ वर्षांत भारता-एवढ्या मोठ्या विस्तीर्ण देशाचा कारभार काँग्रेससारख्या, संघटनेच्या बाबतींत अत्यंत दुर्बल आणि राज्यकारभाराबाबतींत पूर्ण अननुभवी अशा, संस्थेनें पंधरा सरकारें बनवून चालविला. आंतरराष्ट्रीय प्रश्नांचा अभ्यास केलेले व विचार केलेले नेहरू व कृष्ण मेनन यांच्याखेरीज दुसरें कोणी इतके पोक्त व वजनदार काँग्रेसपक्षांत अथवा इतर पक्षांत येथें नाहींतच. आणि परराष्ट्रीय संबंधाबाबत कोणाहि परराष्ट्राशीं साहाय्याच्या करारानें राहोच, पण सल्ला मसलतीवरहि विसंबून वागावयाचें नाहीं अशी जिद्द नेहरूंनीं बाळगलेली. पाकिस्तानची तांत गळ्याला घट्ट आवळलेली. त्याबाबतीं जगांत मित्र असण्यापेक्षां शत्रूच फार. म्हणून भारत-पाकिस्तान सरहद्दीवर सार्वत्रिक दक्षता ठेवणें भाग पडलेलें. जगांत विशेषतः आशियाच्या परिसरांत युद्ध होऊं नये यासाठीं तणातणी सौम्य करण्याकरितां नेहरूंनीं अहोरात्र चालविलेले प्रयत्न व त्याकरितां ज़गावर ठेवलेली पाळत, आणि देशांतील अंतर्गत विकासाचे व राजकीय झगड्यांचे अतिशय जिकरींचे प्रश्न आणि या सर्वांबरोबरच चीनच्या स्नेहाबद्दल वाटणारा अति विश्वास, — या सर्व कारणामुळें लडाखकडे दुर्लक्ष झालें असावें असें मला वाटतें.

× × ×

या लडाख प्रकरणानें जी आत्मनिरीक्षणाची संधि मिळाली आहे व बऱ्याच प्रमाणांत सक्तीहि झाली आहे तिचा योग्य उपयोग आपण करणार असलों तर लडाखबाबत झालेलें भारत सरकारचें दुर्लक्ष हें आंतरराष्ट्रीय कायद्याच्या दृष्टीनें भयंकर असलें तरी व चीनचा अपराध अगदीं अक्षम्य असून आपण त्याला शासन करूं शकत नाहीं हें दुर्दैव खडतर असलें तरी भारत सरकारचें या आक्रमणाकडे झालेलें दुर्लक्ष हें मीं क्षम्यच मानतों. यांत आपलें भौतिक नुकसान कांहींहि झालें नाहीं असें मी वर जाणून बुजून म्हटलें आहे. कारण चीननें व्यापलेल्या आठ हजार मैलांसुद्धां लडाखचा सुमारें बारा हजार चौ. मैल मुलुख जवळ जवळ निर्जन आहे. तेथें कांहीं पिकतहि नाहीं अथवा इतर कांहीं उत्पन्नहि होत नाहीं. त्याच्या अलीकडेहि फार मोठा प्रदेश अत्यंत दुर्गम आहे. त्यामुळें रणनीतीच्या दृष्टीनें आपला कांहीं महत्त्वाचा मुलुख गेला असें म्हणता येत नाहीं. अब्रू गेली एवढी गोष्ट मात्र खरी आहे. अर्थात् ती महत्त्वाची आहेच; पण या भारत–चीन सरहद्दीवरील भारताची अब्रू ही किती विस्तीर्ण पण किती नाजूक व धोक्याची आहे हें भारतीयांनीं समजून घेतलें पाहिजे. आपण हिमालयाचें मोठें कौतुक करतों! तेथें हिंदूंचीं धर्मस्थानें आहेत म्हणून साऱ्या जगांत अत्युच्च असलेले हे सर्व पहाड आपल्याला प्रिय व आदरणीय वाटतात! 'त्यासाठीं छातीचा कोट करून लढलें पाहिजे' असें आपण म्हणतों. पण त्यासाठीं लढता येणारच नाहीं अशा दुर्दैवाच्या परिस्थितींत हे पहाड आहेत हें आपण कधीं समजून घेतलें आहे काय? उंच आकाशांत विहार करीत असलेल्या एखाद्या विमानाचें एंजिन अचानक बंद पडून अथवा पेटून तें विमान आणि त्यांतील प्रवासी हे संकटांत आले असता भूमीवरील लोकांना त्याकडे नुसतें हताशपणें पाहात बसावें लागतें, त्यानां आपलें शौर्य गाजवून कांहींहि मदत करता येत नाहीं अशी चमत्कारिक परिस्थिति या हिमालयाबाबत आहे. हिमालयाच्या सर्व रांगांच्या पलीकडेपर्यंत भारताची सरहद्द आहे असें आपण मानतों. याचा अर्थच असा कीं त्या सरहद्दीच्या आंतील जवळ जवळ शंभर मैल रुंदीचा प्रदेश सर्व पंचवीसशें मैल सरहद्दीवर उंच उंच पहाड, खोल खोल दऱ्या, निबिड अरण्यें, आणि दुर्गम ओढे, नाले व नद्या यांनीं व्यापलेली आहे, व उलट चीनच्या बाजूनें मात्र जवळजवळ सर्व सरहद्दीवर पठार प्रदेश आहे. म्हणजे चिनी लोक या सरहद्दीला सहज सर्वत्र येऊन भिडूं शकतात आणि आमची संरक्षणसामुग्रीच काय पण थोडीथोडीं माणसेंहि आपण त्या शंभर मैल अंतरांत नेऊंहि शकत नाहीं.

\+ \+ \+

भारत–चीन सरहद्दीवर भारत सरकारनें संरक्षणाची तरतूद गेल्या कांहीं वर्षांत केली नाहीं अशी टीका जेव्हां काँग्रेसचे विरोधक आणि नेहरूंचे काँग्रेसमधील विरोधक करीत असतात तेव्हां ती टीका, अगदीं सौम्य शब्द वापरावयाचा म्हटला तरी, मूर्खपणाची असते असें म्हणावेंच लागतें. पंचवीसशें मैल लांब व शंभर मैल रुंद एवढ्या वर सांगितल्याप्रमाणें अत्यंत दुर्गम अशा प्रदेशांत, चीनच्या उत्तरेस आहे तशी हजारों मैलांची भिंत बांधायची कीं फ्रान्स व जर्मनी यांच्यामध्यें इतिहासानें मूर्ख ठरविलेली मॅसिनो लाईन बांधायची, कीं काय करायचें काय? या सर्व प्रदेशाकडे भारत सरकारचें दुर्लक्ष झालें हें खरेंच आहे. पण याचें कारण काय? या सर्व प्रदेशाच्या संरक्षणाची तरतूत करण्याकरितां लागणारी साधनसामुग्री व माणसें या तेरा वर्षांत भारत सरकारजवळ अजूनहि पुरेशी नाहींतच. किंबहुना अमेरिकेसारख्या प्रबल राष्ट्रालाहि असल्या या प्रचंड व विचित्र प्रदेशाची संपूर्ण सुरक्षाव्यवस्था करतां येणार नाहीं असें वॉल्टर लिपमन या जगविख्यात अमेरिकन पत्रपंडितानें लडाखसंबंधानें लिहितांना सूचित केलें आहे. गेल्या तेरा वर्षांत जर भारतानें कांहीं केलें असेल तर पाकिस्तानच्या आक्रमणास पायबंद घालण्याचा प्रयत्न अगदीं निकरानें करून देशाची आर्थिक परिस्थिति सुधारण्याची म्हणजेच देशांतील सर्वांगीण शक्ति वाढविण्याची शिकस्त केली. सरहद्दीचा केवढाहि थोडाफार बंदोबस्त करता येण्यासाठीं या गोष्टी करणें हें अग्रक्रमाच्या महत्त्वाचें होतें. लडाखवर चीनचें आक्रमण होत होतें तेव्हां नेहरूंना तें कळत होतें कीं नाहीं हें मला मला माहीत नाहीं. पंचवीसशें मैल लांब व शंभर मैल रुंद एवढा दुर्गम पहाडांत व त्या पलीकडील प्रदेशांत बाराही महिने सतत २४ तास पहारेकरी ठेवायचे अथवा फिरतीं विमानें ठेवायचीं तर भारताचें सर्व सैन्य अपुरें पडलें असतें आणि विमानदलहि अपुरें पडलें असतें






व ही सर्व शक्ति त्या भागांत नुसत्या पहाऱ्यावारी खर्च केली असती तर अंतर्गत प्रगति मुळींच न होऊन दारिद्र्य व यादवी यांनीं देश आंतूनच खाऊन टाकला असता. कुणालाहि कितीहि हें सर्व लिहिणें अप्रिय वाटलें, आणि नेहरूंच्या फाजील कैवाराचें आहे असें वाटलें तरी तें अनिवार सत्य आहे या दृष्टीनें तें समजून घेतलें पाहिजे. सत्य समजून घेतांना प्रेम, द्वेष, मत्सर हे विकार बाजूस सारावे लागतात. अशा निर्विकारपणेंच मी हें लिहीत आहे. खरोखर लडाखवर आक्रमण होत असता नेहरूंना तें दिसत असलें तरीहि डोळ्यांवर कातडें ओढून अंतर्गत आर्थिक व संरक्षणबळ वाढविण्यांत नेहरू गुंतून राहिले असले तर तें त्यांचें वर्तन क्षम्य होतें असें मी धीटपणें म्हणेन.

\+ + +

येथें इतर अनेक प्रश्न उत्पन्न होतात. काश्मीर जर पाकिस्तानला देऊन टाकलें असतें तर लडाख हा पाकिस्तानचा भाग झाला असता. लडाखवरील लाल चीनचें आक्रमण हें पाकिस्तानवरचें आक्रमण झालें असतें आणि लडाखमधून चीनला मागें हटविण्याची जबाबदारी ही पाकिस्तानची म्हणजे पाक अमेरिकन लष्करी करारामुळें अमेरिकेची ठरली असती. मग नेहरूंनीं काश्मीर पूर्वींच पाकिस्तानला देऊन टाकणें योग्य नव्हतें काय, असा एक प्रश्न आहे. इतिहासांत भावी घटना हेरतांना सुचणारे जे विचार असतात तेच त्यावेळचा इतिहास समजण्यासाठीं उपयुक्त असतात. त्या घटना होऊन गेल्यानंतर सुचणारे विचार हे निवळ तार्किक चर्चेच्या उपयोगी व अर्थात् पुढील इतिहासाला उपयोगी असतात. वरील प्रश्न त्या प्रकारचा आहे. तो नंतर सुचलेला विचार आहे. पूर्वींच्या इतिहासाला त्याचा उपयोग नाहीं. वरील प्रश्नाचें दुसरें उत्तर नेहरूंच्या विशिष्ट परराष्ट्रीय धोरणाशीं भिडलेलें आहे. जगांत त्यांतल्यात्यांत आशियांत, त्यांतल्यात्यांत भारताच्या सरहद्दीशीं युद्ध, महायुद्ध येऊं देऊं नये कारण त्यामुळें झोळींत फक्त निखारे पडून देशाच्या सर्वांगीण विकासाऐवजीं देशाचा सर्वांगीण कोळसाच होईल, ही नेहरूंची दृष्टि आहे. महायुद्धाचा प्रत्यक्ष अनुभव ज्या युरोपियनांनीं व अमेरिकनांनी घेतला त्यांना नेहरूंचा गेल्या १३ वर्षांतील हा दृष्टिकोण अलीकडे विशेष पटूं लागला असून नेहरूंनीं गेल्या अकरा वर्षांत अनेकदां युद्ध थोपविलें असण्याचा संभव आहे. हें त्यांना हल्लीं पटत असून त्यामुळें पाश्चात्य राष्ट्रें नेहरूंवर प्रेम करूं लागलीं आहेत. भारतीयांत अजून 'युद्धस्य वार्ता रम्या' हीच मनःस्थिति असल्यामुळें नेहरूंच्या या युद्ध टाळण्याच्या धोरणाचें महत्त्वच त्यांना उमजत नाहीं. म्हणून मग त्यांनीं नेहरूंना दोष द्यावा हें ठीक आहे. पण लडाखच्या रक्षणासाठीं पाकिस्तानतर्फे अमेरिका जरी चीनशीं लढली असती तरी त्यांत भारताला धोकाच होता. कारण भारताच्या सरहद्दीशी त्यामुळें युद्ध येणार होतें व तें संकट होतें, असें नेहरूंचें मत असणें स्वाभाविक आहे. शिवाय लडाखचा प्रदेश काश्मीरबरोबरच पाकिस्तानांत जाऊं दिला असता तरी बाकीची पंधराशें मैल भारत चीन सरहद्द कोणालाहि देऊन न टाकतां आपल्याच गळ्याची तांत म्हणून सांभाळावी लागलीच असती ना ? लडाखऐवजीं नेफा विभागांत चीननें आक्रमण केलें असतें तर ? कांहीं टीकाकारांनीं असें म्हटलें आहे कीं भारताशीं अमेरिकेनें लष्करी साहाय्याचा करार केला असता तर भारतावर चीनचें आक्रमण झालेंच नसतें. कारण त्या स्थितींत चीनशीं युद्ध करण्याची जबाबदारी अमेरिकेवर होती व फोर्मोसावर ज्याप्रमाणें लालचीन हल्ला करीत नाहीं त्याप्रमाणें त्यानें भारतावरहि केला नसता. कांहीं प्रमुख वृत्तपत्रांनीं व मुत्सद्यांनीं हा युक्तिवाद केला आहे.

\+ + +

येथेंहि नेहरूंचा एक विशिष्ट व शास्त्रशुद्ध असा दृष्टिकोन आहे. अमेरिकेसारख्या राष्ट्राशीं लष्करी साहाय्याचा करार करण्यांत नेहरूंच्या मतें दोन मुख्य तोटे आहेत. पहिला तोटा भारताचें स्वातंत्र्यच त्यामुळें गमावलें गेलें असतें हा. अमेरिकेसारखे बलशाली राष्ट्र भारताच्या संरक्षणाची हमी घेईल तर प्रथम भारताचें संरक्षण आपण करूं शकूं इतका व्यापक ताबा त्याला भारताचा घ्यावा लागेल. भारताचें स्वतःचें बळ थोडें आणि रणनीतिदृष्ट्या मोक्याच्या व धोक्याच्या जागा फार. देशांतील अंतर्गत सुव्यवस्थेची परिस्थिति बिघडली तरीहि संरक्षणाला धोका येतो. अर्थात् अमेरिकेच्या संरक्षण दलांनीं आपला देश आंतून इतका व्यापला असता कीं तो आंतून सर्वांगांनीं जखडला जाऊन लष्कर, पोलीस व अनेक आर्थिक बाबी यांबाबत भारताची स्वायत्तता नष्टच झाली असती. आणि यांतूनच उत्पन्न होणारा दुसरा तोटा म्हणजे अमेरिकेशीं सख्य करणाऱ्या सरकारला अमेरिकेनें स्वाभाविकच पाठिंबा दिला असता आणि त्यामुळें तें सरकार बदलून टाकणें देशांतील जनतेला अथवा इतर पक्षांना अशक्य झालें असतें. इंग्लंडसारख्या स्वतः बलवान असलेल्या राष्ट्रानें अमेरिकेची मदत घेतली तर परिस्थिति इतकी पराधीनतेची होत नाहीं. पण तुर्कस्तान, पाकिस्तान, इराण, द. कोरिया या चारहि मागासलेल्या राष्ट्रांत वर सांगितलेले दोन्हीहि तोटे अनुभवास येत आहेत. या राष्ट्रांच्या जुलमी राजवटी दीर्घकालानें बदलल्या तरीसुद्धां त्या अमेरिकेच्या अंगुलीनिर्देशानें व अमेरिकेला हव्या तशा व तेवढ्याच बदललेल्या आहेत. त्यांची आर्थिक प्रगति होण्याऐवजी पिछेहाट झाली आहे. आणि त्यांचें स्वतःचें संरक्षणबळ वाढण्याऐवजीं कमीच झालेलें आहे. वस्तुतः या राष्ट्रांचें स्वातंत्र्य अमेरिकन साहाय्यानें जवळजवळ खच्ची झालेलें असून अमेरिकेचें बळही या राष्ट्रांच्या सख्यानें वाढविण्याऐवजीं हीं राष्ट्रें अमेरिकेला भारभूत झालीं आहेत. त्यांच्याशीं तुलना करतां भारताचें आर्थिक बळ वाढलें आहे. संरक्षणबळहि गेल्या १३ वर्षांत वाढलें आहे. आणि लोकशाही येथें शाबूत व समर्थ आहे. म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य, टीका करण्याचें स्वातंत्र्य, संघटनास्वातंत्र्य आणि सरकार बदलून टाकण्याची जनतेची शक्यता या सर्व गोष्टी अमेरिकेच्या सख्यांतील वरील चार राष्ट्रांपेक्षां आपल्या देशांत अधिक चांगल्या प्रमाणांत शाबूत व मजबूत आहेत. दुर्दैवानें भारतांतील विद्वानांच्याहि मनावर हा स्वातंत्र्यप्रीतीचा शास्त्रशुद्ध दृष्टिकोन बिंबलेला नसल्यामुळें अथवा फक्त स्वदेशी वरिष्ठ वर्गाच्या सामाजिक व आर्थिक हिताचाच विचार ते लोक करीत असल्यामुळें लष्करी साहाय्याबाबतच्या कराराचा नेहरूंचा दृष्टिकोन त्यांना पटत नाहीं. कारण यांना तो

( पान ५८ वर चालू )






( पान १२ वरून चालू )

वाङ्मयाबद्दल विषय काढण्याऐवजी जेवणाखाण्याची घरगुती गोष्ट काढली नि माझी मात्रा उपयोगी ठरली. ती स्त्री हसली. जरा मोकळेपणीं—जरा तुसड्यासारखी. "सगळा खुळेपणा...दोनचारदां तर शाईच कालवली ताटांत...पुन्हां सैपाक करावा लागायचा. माझ्या कष्टांचं, माझं कांहींच भान नव्हतं तिकडे...भिकेचे डोहाळे ..तेच अजून भोगते आहे..." मला वाटलं तिनें डोळ्याला पदरहि लावला.

" अपरात्री उठून आंघोळ करीत असत ना ? "

" सगळ्यांच्या नांवानी आंघोळ केली होती त्यांनीं—"

ती बोलकी झाली. पण रडवेली, चिडकी झाली. संसाराच्या तिच्या सगळ्या स्मृति तापदायक होत्या हें मी हेरलं व अंमळ गप्प झालो.

एकाएकी तिनें तिरीमिरीनें विचारलं,

" तुम्ही नाटकांच्या हक्काबद्दल विचारायला आला नाहीत ना ?... परवां दोघं येऊन गेले म्हणून विचारत्ये. पुस्तकं छापायला नि प्रयोग करायला आता लोकांना बळ आलंय...पण तें सगळं आमच्या सावत्र दिराकडे आहे. माझे दागिने जसे लुबाडले त्यानें तसें ह्यांचेहि..."

त्या लेखकाच्या नाटका कादंबऱ्यांच्या हक्काबद्दल चाललेले झगडे मला माहित होते. ह्या स्त्रीला त्याची अशी झळ लागावी ह्याचं वाईट वाटलं. लेखनाची मालकी आपल्याकडे असावी ह्याबद्दल ती आतुरहि दिसेना. मग मी वेगळाच विषय काढला.

" त्यांच्या लेखनाची एखादी चोपडी, आहे का ?—हस्ताक्षर म्हणून पहायला...एखादा फोटो जुनं पत्र..."

खोलीभर तिची उगाचच नजर फिरली. त्यामागोमाग माझीहि. लांबटशी, अंधेरी जागा बहुतेक मोकळी होती. एक जुनाट कॅलेंडर, कंदील, पोथ्या, जुनेरं...मी मोजदाद करूं लागलो.

" कांहीं वह्या होत्या, त्या रद्दीत फुंकून टाकल्या मीं. रेशन आणायचं होतं म्हणून...फोटो काढला होता कुठं ?—परवा म्हणे कुठें पुण्यतिथी साजरी झाली तेव्हां त्यांच्या मोठ्या फोटोची पूजा केली...पूर्णिमा सांगत होती..."

तिच्या बोलण्यांत कुतूहल, कौतुक—कांहीं नव्हतं. नवऱ्याच्या लेखनगुणांचं तेव्हांहि तिला अप्रूप नव्हतं. आणि आतां त्याला मिळणाऱ्या अमाप कीर्तीचीहि तिला शुद्ध नव्हती. मला तिची दया आली. आणि जराशी चीडहि ! मासिकांत तिच्या पतीचे फोटो छापून येतात —तें नको कां हिनें आणून ठेवायला ? त्याच्या पुस्तकांची एखादी प्रत ? त्याचं एखादं जुनं पत्र तरी सांभाळलाय का हिनें ?—

आमच्या संपादकांच्या गप्पा आठवल्या. आयुष्याची शेवटची दोन वर्षे लेखक घराबाहेरच होते. नाटकमंडळीसह हिंडत होते. शेवटच्या आजारपणांतहि बायकोला कळवलं नाही...

मी त्या स्त्रीकडे निरखून पाहूं लागलो. कुरूप, अशिक्षित, अडाणी ..कसा झाला असेल दोघांचा संसार ? त्यांनी हिला दुःख दिलं, दारिद्र्यांत ठेवलं, आपल्या मागें अर्धपोटी जगत ठेवलं...तिनें नवऱ्याला काय दिलं ? त्याच्या लेखनात सूचित होणारी स्फूर्तिदेवता, निर्व्याज प्रेम करणारी त्यागी स्त्री, स्वर्गीय भावनेची जननी...तिनें त्याला कांहीं सुख दिलं कीं केवळ ढकलत संसारच केला ?

मला माझ्या लेखक मित्राची सूचना आठवली व मी म्हटलं, " तुमच्या यजमानांची किंमत आता जगाला कळली आहे... त्यांचा पुतळाहि लवकरच एक मोठा समारंभ व्हायचा आहे...त्यांचा पुतळाहि उभारला जाईल. आणिक कांहीं स्मारकं होतील...तुम्हाला समारंभाला बोलवून सत्कार करावा, तुमच्यासाठी फंड काढावा अशी माझ्या स्नेह्यांची योजना आहे..."

तिचं कपाळ आठ्यांनी भरलं. चेहेरा विद्रूप झाला. ' समारंभाचा नि माझा काय संबंध–' अशा अर्थानें तिनें पाहिलं. "...माझा कसला सत्कार..." ती पुटपुटली. मला नकोय कुणाची भीक अशा अर्थाची मान फिरवीत ती उठली.

मलाहि उठावं लागलं. थिसीससाठी कांहीं मटिरियल मिळालं नाहीं. पाय मात्र तेथून कांढवेना. उजव्या बाजूच्या खिडकीशी बसून लेखक लिहीत असणार ह्या कल्पनेनें खिडकीशी गेलो.

तेवढ्यांत दारांत कुणी पोक्त स्त्री येऊन उभी राहिली. "वहिनी, थोडी पुरणपोळी आणलीय—" ती डब्बा पुढें करीत म्हणाली.

" ये पूर्णिमा; नेहमी नेहमी काय आणतेस...हे बघ, ह्यांच्याबद्दल माहिती विचारायला आले आहेत..."

पूर्णिमेची व माझी दृष्टादृष्ट झाली. तीहि खंगलेली, पोक्त स्त्री होती. पण सौन्दर्यातल्या जुन्या खाणाखुणा अजूनहि ओळखतां येत होत्या. खोल डोळ्यांच्या आतून वेगळ्या व्यक्तिमत्वाचा प्रकाश बाहेर पडत होता. तिच्या आकृतीतच बुद्धिमत्ता व समंजसपणा भरला होता. एकदम वाटलं, हिचं आयुष्य जगावेगळं असावं !

पूर्णिमेनें माझ्याकडे भरल्या कौतुकानें पाहिलं. लेखकासाठी मी इतक्या दूर, इथे आलो, त्यांना इतका मानतो ह्या जाणीवेनें ती गलबलून गेल्यासारखी वाटली.

तसंच पहात राहाणं वाईट दिसेल म्हणून मी खिडकीबाहेर नजर टाकली. त्या वास्तूतून जाणं जीवावर आलं होतं व डोळे समोरच्या वनराईवर पखरण घालीत होते. दृष्टी स्थिरावत होती एका रानझुडुपावर ! ते जुनाट झुडुप विचित्र तऱ्हेनें वाढलं होतं. लाखों रंगीबेरंगी फुलांनीं डवरलं होतं. नजर टिपत होतं, मन नाचवीत होतं. एकाएकी कल्पना आली कीं लेखक ह्या स्वर्गीय वनस्पतीकडे पहातांना देहभान विसरत असतील. रोज ह्या खिडकीत बसून त्या वास्तूशी संभाषण करीत असतील...

निसर्गाचं तें नक्षीकाम...आगळ्या व्यक्तिमत्वाची पूर्णिमा... ओढग्रस्त संसार सावरूं पहाणारी धर्मपत्नी...लेखकाच्या प्रतिभेनें कुठून जीवनरस शोषला ?...कोण त्या प्रतिभावंताची सती... स्मृति...?...

## एक करुण रसचित्र

दहींसागरांत बुडालेल्या वड्याला
कोणीतरी चमचानें वल्हवत वल्हवत
जिव्हाग्राशीं आणून सोडलें पण हायरे दुर्दैवा !
लाळेच्या लाटेमुळें तो अथांग उदरांत पुन्हां बुडाला

—शां. शं. रेगे






# अनरसा



*सूर्यग्रहणाच्या दिवशीं अलकेनें तो खाल्ला नसता, तर एवढें महाअरिष्ट ओढवलें नसतें, असा अप्पानीं निर्वाळा दिला. आपल्या कुकर्मांवर पांघरूण घालण्याकरितां त्यांनीं या अंधश्रद्धेचा फायदा घेतला का ?...*

जयवंत दळवी

तीन नंबरमधली वेन्नी...कसली जगणार ? ...तिच्या डोळ्यांच्या खांचा...जगून तरी काय होणार ?...

डॉक्टरांच्या तोंडून काल ऐकलेले ते शब्द आप्पांच्या कानांत नको होऊन फुसफुसत राहिले.

...शेण खाल्लं...शेण...

आपण शेणाच्या गायरींत बसलों आहे आणि शेणाच्या कुजकट वासानं आपलीं इंद्रियं सडूं लागलीं आहेत असं वाटून आप्पा सारखे खंगत राहिले.

गॅलरींतल्या कोळशाच्या पेटीवर ते किती तरी वेळ बसून राहिले होते. अस्वस्थ होऊन त्यानीं मांड्या बदलल्या. उठून उभे राहिले. पुनः बसले. सारखं हें असंच.

एका रात्रींत त्यांचे डोळे खोल गेले. दुष्काळी विहिरीसारखे म्हणतां म्हणतां आटले. शुष्क झाले. डोळ्याच्या आसपास धूर अडकून स्थिर व्हावा तशीं काळींकुट्ट वर्तुळं पक्कीं झालीं. आणि फक्त रात्रींत !

आप्पा बसून होते !

आतां कांहींच करतां येण्यासारखं नाहीं अशा हरपल्या भावंड्या भावनेनं ते हवालदील होऊन बसले होते. सारं दुःख पिकून वर आलं होतं. अंगभर फुसकारत होतं. नसानसांतून तीक्ष्ण कांटे टोंचले जात होते. आणि छिद्रांछिद्रांतून कातडं फाटणार कीं काय या भीतींतच ते गायब होत होते.

पांचसहा मरतुकड्या पोरांचं लटांबर घेऊन पायाशीं घोटाळणाऱ्या मांजरीला त्यांनीं पायानंच अलगद लोटून दिलं. यावेळीं त्यांना ती आणखी एक कटकट नको होती. हडप लागलेल्या त्या मांजरीची त्यांना मनस्वीं-किळस आली. तिच्या स्पर्शानं त्यांची अशक्तता वाढू लागली.

मुठींत धरलेल्या विडीचा झुरका त्यांनीं एकदम दमछाक करून घेतला. इतका कीं त्यांचे डोळे रक्त गोठून लाल झाले. आणि खोकल्याची एक जबरदस्त उबळ येऊन त्यांच्या अंगाखालीं हाडें सैल झाल्यासारखीं झालीं.



अनुक्रमणिका





मस्तकाला कीड लावणाऱ्या या विचारांत आणखी थोडा वेळ गेला तर आपण भेगाळलेल्या भिंतीसारखें कोसळून खालीं पडूं या भीतीनं आप्पा हलुहलू उभे राहिले. त्यांनीं पुनः एकदां उजळ विचार केला...तसं कांहीं असेलच असं नाहीं. तसं कांहीं नाहीं असा डॉ. पावरीनं दिलासा दिला होता. पावरींच्या दवाखान्यांतून मागच्या दरवाजांतून पळ काढण्याचे दिवस त्यांना पुनः एकदां आठवले आणि छातींत अकारण धडधड चालू राहिली.

गॅलरींतून आंतल्या खोलींत ते चोरासारखे आले. अगदीं मांजरीच्याच पावलानं! लूत लागून विद्रुप झालेली ती मांजरीहि आंत आली. आणि तें मरतुकडं लटांबरहि चिवचिवत आंत आलं.

खोलींतल्या खोलींत येरझारा घालीत त्यानीं बराच पश्चाताप केला. मन भाजून पोळून घेतलं...जें घडलं तें घडतां कामा नये होतं...शी...शी...!

ते येरझारा घालीत राहिले.

तें घाणेरडं मांजरहि उपासमारीनं मॅंव मॅंव करीत तिथंच रेंगाळत राहिलं.

"हुडूत"—असं एकदां जोरकसपणानं खेंकरून ते आंतल्या खोलीत गेले.

आंतल्या खोलींत सुहास मंद कधी पावलांनीं फेऱ्या घालीत होती. आणि नंदा कावरा बावरा होऊन पलंगाच्या कडेवर बसला होता.



कोणत्या क्षणाला उठून धांवपळ करावी लागेल याची कल्पना नसल्यासारखा. त्याची नजर पुरती भाबडी झाली होती.

"ऑ...?" कुणाच्या तरी हांकेला ओ दिल्यागत आप्पांच्या तोंडून शब्द निसटला.

सुहास ताटकळून थांबली.

नंदा ताडकन् उठून उभा राहिला.

"अजून कांहीं नाहीं ना?" त्यांनीं कपाळावरील आंठ्या रेखीव केल्या. गळ्यांतले कढ गरम झाल्याची त्यांना जाणीव झाली.

सुहासनं नकारार्थी मान हालवली.

"वेळ लागेल असं दिसतंय!" नंदानं आपली कोरडी जीभ शुष्क ओठावरनं फिरवली. भयभीत झाल्यामुळें त्याची बुबुळं अकस्मात जागच्या जागीं गरगरलीं.

"हूं!" एवढाच हुंकार देऊन आप्पा पुनः दिवाणखान्यांत आले आणि कांहीं क्षण खुळ्यासारखे या कोपऱ्यांतून त्या कोपऱ्यापर्यंत फिरले. मध्येंच पलंगपोस वर करून त्यांनी आपली ट्रंक ओढली. जानव्यांत अडकवलेली किल्ली पुढं करून ट्रंक उघडली आणि आजवर जमवलेल्या खेळण्यांवर पुनः एकदां नजर फिरवली. मनांतली कीड उपटून टाकायचा त्यांचा विचार होता. यावेळीं त्यांना थोडी हुशारी हवी होती. थोडी उमेद हवी होती. झालं गेलं विसरून जाऊन मुद्रेवर तवानी आणायची होती. ट्रंकेंतलं केसाळ अस्वल उचलून त्याच्या केसावर अलंग हात फिरवावा असं त्यांना वाटलं. पण तें पाहून त्यांना त्या भिकारड्या मांजराची किळसवाणी आठवण झाली. म्हणून अस्वलाला स्पर्श न करतां त्यांनी शुभ्र सफेत ससा उचलला. सशाच्या शेपटाकडून निघालेल्या रबरी नळीचा फुगा दाबला आणि त्याला पलंगाखालींच टुणुक टुणुक उड्या मारूं दिल्या. पण त्यांना चिन्ता होती ती जपानी म्हाताऱ्याची. "जपानी माल, आणि पुनः म्हातारा. म्हाताऱ्याचं हें असंच!" असं स्वतःशींच पुटपुटत ते त्या म्हाताऱ्याला डॉक्टरच्या नजरेनं न्याहळूं लागले.

...बसल्या बसल्या पाठीमागनं त्यांच्या गळ्याभंवतीं कोवळ्या हातांची नाजुक अलगद मिठी पडली.

"कोण सांगा आजोबा!"

"लबाडा—" असं म्हणून ते मोठ्यानं खो खो हंसले. मग आपण खरोखरच मोठ्यानं हंसलों कीं काय असा संशय येऊन ते कमालीचे कावरेबावरे झाले. चोरटेपणानं डोळ्यांच्या कडांतून त्यानीं आजुबाजूला पाहिलं, आणि उठण्यासाठीं म्हणून जमिनीवर हात टेकला तोच फुग्यावर हात पडून सशानं टुणकन् उडी मारली.

"आजोबा!"

"ओ?"

"मी तुमच्या पाठीवर बसणार."

आप्पा गुदगुल्या होऊन हंसले.

"मी हम्मा हम्मा करणार."

आप्पा गुडघ्यावर ओणवे झाले.

"काय शोधताय आप्पा?" नंदानं एकदम पाठीमागनं विचारलं. विजेचा झटका बसल्यासारखे आप्पा ताठ उभे राहिले.







अनुक्रमणिका

"छे–कुठं काय ? कांहीं नाहीं !" असं ओशाळून म्हणत त्यांनीं ट्रंक झपाटल्यागत पलंगाखालीं लोटली.

"आप्पा, मी टॅक्सी घेऊन येतो." नंदा गर्भगळीत होऊन म्हणाला.

"नको. तूं थांब इथं. मीच पळत जातो नि टॅक्सी घेऊन येतो." वाक्य पुरं होण्याआधींच आप्पानीं चप्पल घातलं नि ते दोन दोन पायऱ्या सोडून पळत सुटले.

पलंगाला लवंडून सुहास उभी राहिली. तिच्या तांबारलेल्या गालावर टिपं घसरूं लागलीं. गरीब गाय होऊन धडधडत्या उरावर तिनं हात ठेवले.

"घाबरूं नकोस तूं !" नंदा स्वतःचाच भित्रेपणा लपवीत होता. गिळलेला आवंढा घशांतच अडकत होता.

घरांतल्या भांड्याकुंड्यावर, कपड्यालत्त्यावर कपाटपलंगावर लोमस नजर फिरवतांना तिला वेगळाच हुंदका आला. या भरल्या संसारांत आपण पुनः येऊं कीं नाहीं असा एक कातर विचार तिच्या मनांत आला आणि ती एकदम गर्भगळीत झाली. तिनं नंदाच्या छातीवर डोकं टेकलं आणि ती स्फुंदून रडली. भावडेपणानं—व्याकुळ होऊन.

"सगळं व्यवस्थित पार पडेल." सुकलेल्या आवाजाबरोबर नंदाचे डोळे ओले झाले.

"पण भीति वाटते !" तिचं अंग एकाकी शहारून आलं.

"कशाला घाबरायचं ? डॉक्टर म्हणालेत सारं ठीक आहे म्हणून."

"मीच मेली वेंधळी. सूर्यग्रहणादिवशीं अनरसा मोडून खाल्ला."

"त्या गांवठी कल्पना आहेत. कांहींहि होत नाहीं."

"नाहीं कसं ? अलकेनं चंद्रग्रहणादिवशीं भाकरी मोडली तर मुलीचा कान फाटलेला निघाला."

नंदाला खुलासा देतां आला नाहीं. उलट तोच घाबरला. म्हणाला "मग अनरसा खावा कशाला ?"

"मला वाटलं ग्रहण सुटलं म्हणून ! पण आप्पा म्हणाले सुटलं नव्हतं."

"आप्पानाहि कळलं ?"

"कळलं !"

"काय म्हणाले ?"

"खूप ओरडले."

"झालं तें झालं ! आतां घाबरण्यांत अर्थ नाहीं." तो स्वतःलाच समजावण्यासाठीं पुटपुटला.

"माझे तर हातपाय आत्तांच विरघळताहेत !"

"कांहीं घाबरूं नकोस. फार तर काय ?—मुलाचा कान फाटका निघेल एवढंच नां ?"

"काय परिणाम होईल देव जाणे !" तिनं आवरतां आवरतां मोठ्यानंच हुंदका दिला.

"असूं दे. पण तूं रडूं नकोस. त्रास होईल तुला !" नंदाला वाटत होतं आपणच भोकांड पसरून रडावं आणि मनावरलं ओझं हलकं करावं

तेवढ्यांत दरवाजा वाजला.

नाकपुड्या मोठ्या करीत आप्पांनीं श्वास ओढून घेतला. पण धाप ओसरत नव्हती.

"चला—चला. आतां वेळ नका काढूं !" धापांतच त्यांचे शब्द गुरफटले.

देवापुढं नारळ ठेवून आप्पांनीं उदबत्त्या लावल्या. सुहासनं नमस्कार केला. तिच्या मिटलेल्या पापण्यांतून दवबिंदूसारखीं टिपं ओघळलीं.

आप्पांनीं साष्टांग नमस्कार घातला. ते पराभूत झाले.

"प्रभो, आतां माझी सारी भीस्त तुझ्यावर. चुकलं माकलं जाऊंदे. पोराला तुझ्या पायावर ठेवीन..." असं कांहीं तरी ते चुटपुटत बोलले आणि त्यांनीं लाचारीनं देवापुढं नाक घासलं. उठतां उठतां "माझा वंश..." एवढेच शब्द अनाहूतपणें त्यांच्या तोंडून निसटले आणि पुढचे शब्द हुंदक्यांतच विरघळले.

नंदा विमनस्क होऊन उभा होता.

"तूं उभा कां ? लोटांगण घाल !"

नंदा लोटांगण घालीत असतांना ते अक्षरशः रडवेले झाले. "तूंच सांभाळ यांना..." असं म्हणण्यासाठीं त्यांच्या मिटलेल्या तोंडांत जीभ तडफडली. त्यांनीं सर्वांना अंगारा लावला आणि देवाच्या अंगावरचीं दोन फुलं उचलून स्वतःच्या खिशांत टाकलीं.

हॉस्पिटलमध्यें प्राथमिक तपासणी होऊन आठ नंबरच्या खोलींत सुहासची व्यवस्था झाली. खोलीबाहेरील बांकावर आप्पा अस्वस्थ होऊन बसले. त्यांच्या पोटांत गोळा फिरूं लागला. म्हणून त्यांनीं जपमाळ खिशातनं काढली आणि ते जप करूं लागले.

"तूं उभा कां ?" ते नंदाला म्हणाले.

"तूं जा, आणि महालक्ष्मीवर अभिषेक करायला सांग. मी सांगितलंय म्हणून सांग जोशींना..."

नंदाला तिथं थांबायचं होतं. पण नाइलाजानं कुरकुरत त्याला निघावं लागलं.

" टॅक्सीनं जा. पैसे आहेत कीं हवेत ?"

" आहेत." तो जड पावलांनीं बाहेर पडला.

आप्पांनीं बसताना बांक डाव्या हातानं घट्ट पकडला आणि तोंडानं ते जप पुटपुटूं लागले. पण त्यांचं लक्ष मात्र खोलींत होतं. एखादी दुसरी नर्स घाईघाईनं आंत येत होती, बाहेर जात होती. पण आप्पा त्यांच्या गणतींतच नव्हते. त्यांना वाटलं, नर्सला थांबवून सांगावं कीं डॉक्टर आपले स्नेही आहेत म्हणून. म्हणजे तरी त्या आपुलकीनं वागतील. कांहीं विचारलं तर प्रेमळपणें कांहीं सांगतील. एवढंच त्यांना हवं होतं. याक्षणीं त्यांना सर्वांची आपुलकी हवी होती.

नर्स समोर येतांच त्यांना वाटलं, हिला आपण अनेकदां पाहिलेली आहे. ही ओळखेल. हिला विचारावं...पण त्यांचा गळा पारव्या-सारखा तट्ट फुगला. जीभेचा गोळा झाला, आणि तेवढ्यांतच झटक्यानं ती पुढं निघून गेली. काय विचारायचं होतं तें कळण्या-आधींच ती डोळ्याआड झाली.

" काय करताहेत तें करूं देत !" असं स्वतःलाच सांगत ते पुनः खाली बसले. त्यांनीं ठरवलं, आतां डोळे मिटून देवासारखं बसायचं. म्हणजे ही होलपट तरी थांबेल. आणि मन जरासं शांत होईल. त्यांनीं डोळे मिटले मात्र, आणि त्यांच्या खांद्यावर हाताचा स्पर्श झाला.

" ओ ! डॉक्टर ?" आप्पा जवळ जवळ दचकूनच ओरडले.

" चला माझ्या खोलींत. कांहीं घाबरण्याचं कारण नाहीं. थोडा चहा पिऊं. म्हणजे तुम्हालाहि बरं वाटेल." डॉक्टरांच्या या शब्दानं आप्पांना खरोखरच बरं वाटलं.

" तसा मी फारसा घाबरलेलों नाहीं. पण पहिलंच बाळंतपण आहे तिचं. आणि हा नंदा माझा एकुलता एक मुलगा. त्याचं सुख तेंच माझं !" आप्पांचे ओठ वांकडे झाले आणि त्यांच्या डोळ्यांत पाणी झिरपूं लागलं.

" पहिल्या वेळीं भीति वाटणं साहजिक आहे." कांहीं तरी बोला-यला पाहिजे म्हणून डॉक्टर बोलले. पण त्यांचं खरं लक्ष होतं निरनिराळ्या केस-पेपर्समध्यें.

" शिवाय आमच्या घराण्यांत एकुलत्या मुलाचं प्रस्थ आहे." डॉक्टरांचं लक्ष वेधण्याचा एक प्रयत्न.

" म्हणजे कसं ?" डॉक्टर केस-पेपर वाचूं लागले.

" माझ्या आजोबांना एकच मुलगा. माझ्या वडिलांना मी एकटाच. मुलाहि नंदा एकटाच. म्हणून अधिक भीति !"

" चिन्ता नका करूं ! मिस् आपटे !"

" येस् डॉक्टर—"

" सात नंबर ?"

" ठीक आहे."

" अकरा ?"

" ओ के."

" तीन ?"

" तीन नंबरमधल्या बेबीचाच प्रश्न आहे."

" होपलेस ! तें पोर मुळींच जगायचं नाहीं."

" जगायचं नाहीं ?" आप्पा धक्क्यानं वर उठले.

" तीन नंबरमधलं !" डॉक्टर म्हणाले.

" कां ?–कां बरं ?"

" बाप बाहेर शेण खातात आणि मग असे पस्तावतात."

" काय झालं काय ?" माहीत असूनहि आप्पानीं तेंच पुनः विचारलं.

" त्या पोराच्या डोळ्यांच्या खांचा झाल्या आहेत. तें कसलं जगणार ? आणि जगून तरी काय होणार ?" डॉक्टरांच्या मुद्रेवरील तिरस्कार जळजळीत झाला.

" बापाची कर्मं पोराला भोगावीं लागतात..." आप्पा चुटपुटत राहिले.

" बापाचीच कां ? – आजोबाची सुद्धां !"

" आजोबाची ?" एकदम पाय घसरून पडल्यासारखं त्यांना वाटलं.

" हो ! कधीं कधीं हा रोग तिसऱ्या पिढींतसुद्धां उद्भवतो."

" बापरे !" आपण एकदम आकांतून बापरे म्हणायला नको होतं याची त्याना चुटपुटून जाणीव झाली. म्हणून ते पुनः म्हणाले, " शेण खायचंच कशाला ? हलकट लेकाचे...मूर्ख..."

" हं !" डॉक्टर नुसतेच हुंकारले.

ते असे का हुंकारले ? बोलले कां नाहींत ? केस-पेपरमध्यें पहा-ण्याच्या निमित्तानं ते आपल्याकडेच चष्म्यांतनं पहात आहेत असा आप्पाना संशय आला.

" डोळे गेले...खांचा झाल्या..."

" डोळे ? हें कांहींच नाहीं. भयंकर परिणाम होतात."

" भयंकर ! भयंकर !" आप्पांच्या शरीरांचीं रंध्रं गुदमरून गेली.

" तुम्ही कांहीं घाबरूं नका." डॉक्टर पुनः तेंच म्हणाले.

" छे ! छे ! मी कशाला घाबरतोय ?" असं म्हणत आप्पा उसनं हंसले. तुम्ही घाबरूं नका असं डॉक्टर कां म्हणाले असतील ? कसा बसा चहा पिऊन आप्पा तिथनं निसटले आणि आठ नंबर समोर येऊन बांकावर बसले. नाजुक जागीं गळूं ठणकावं तसं होऊं लागलं.

थोड्याच अवधींत नंदा आला, तेव्हां त्यांना धीर आला. नाही तरी गुपचूप बसून ओढवून घेतलेला एकांत त्यांना असह्यच झाला होता.

" काय म्हणाले डॉक्टर ?"

" कांहीं नाहीं. ठीक आहे म्हणाले. ते तरी दुसरं काय सांगणार ? नशिबांत असेल तें होईल !"

" कां ? डॉक्टर आणखी कांहीं म्हणाले ?"

" आणखी ? आणखी काय म्हणणार ? तुला कांहीं म्हणाले होते ?"

" छे !"

" मग तूं आणखी कांहीं म्हणाले का असं कां विचारलंस ?"

" सहजच ! अभिषेक सुरू केलाय !"

" हं !"






डॉक्टर आणखी काहीं काय म्हणणार ? नंदानं असं कां विचारलं ? याच प्रश्नांच्या गुंतावळ्यांत त्यांचं मन गुरफटूं लागलं.

तेवढ्यांत थोडी धांवपळ झाली. एक नर्स धांवत डॉक्टरकडे गेली. अर्धवट धांवतच डॉक्टर आठ नंबरमध्यें आले. दरवाजा बंद झाला. नर्स व डॉक्टर यांचे पुसटसे शब्द ऐकूं येत होते तेवढेच !

दरवाजावर कान लावून आप्पा अधीरतेनं ऐकत होते. त्यांचे डोळे ससासारखे विटविटत होते. नंदा कणाकणानं विरघळत उभा होता. अनेक विचित्र विचारांनीं त्याचा मेंदू चिवडला जात होता.

" रडल्याचा आवाज आला...? " आप्पा गुदमरून म्हणाले. स्मिताची एक पुसटशी रेषा त्यांच्या ओठांवरनं तरळून गेली.

" कुणाचा ? " नंदा अधिकच खंगला.

" तूं ऐकलास ? मुलाच्या रडण्याचा ? "

" छे ! "

" मी ऐकला. स्पष्ट..." तेवढ्यांत आणखी कसला तरी आवाज आला म्हणून आप्पांनीं कानांत जीव ओतला.

दाराची कडी वाजली. डॉक्टर बाहेर आले.

" काय झालं ? " आप्पा उत्सुक झाले.

" व्हेरी सॉरी ! "

" पण झालं काय ? "

" मुलगा आधींच गेलेला होता. "

" गेलेला ? " आप्पा आकांतून ओरडले.

" पण बाळंतीण ? " नंदा अधीर होऊन पुढं वांकला.

" खुशाल ! " डॉक्टर निघून गेले.

" काय झालं हें ? " असं म्हणत आप्पा खालीं बसले.

नंदाहि भुवया चेपीत स्वस्थ बसला.

" असं कसं झालं ? "

" नशीब आपलं ! बाळंतीण क्षेम आहे हें कांहीं कमी नाहीं. तूं आतां अधिक विचार करूं नकोस—"

नर्सीस बाहेर आल्या तेव्हां दोघेहि आंत गेले.

सुहास लालबुंद चेहऱ्यानं रडत होती.

" रडूं नकोस. आपल्या नशिबीं नव्हता एवढंच ! " आप्पा गदगदून गेले.

" पण असं कसं झालं ? " खूळ लागल्यागत नंदा पुनः पुनः तोच प्रश्न विचारीत होता. तोच प्रश्न—असं कसं झालं ?

" त्याच्या सबंध अंगावर पुरळ होता. " सुहास रडत म्हणाली.

" पुरळ ? " आप्पा झटक्यानं उठले आणि मग भानावर येऊन खालीं बसले.

" पुरळ ? " विचार करीत नंदानं आप्पांच्या तोंडाकडे पाहिलं.

" कशामुळें ? " नंदानं आपल्या तोंडाकडे कां पाहिलं.

" कशामुळें ? विचारूं डॉक्टरना ? " नंदाचं हळवं कुतूहल जागृत झालं.

( पान ३० वर )



design and decoration

# लि ओ लि ओ नी

a painting

*जाहिरातींचा हेतू लक्षांत घेऊन, वरवरच्या तांत्रिक कसबापेक्षां, दृष्यविषयाच्या रसरशींत जिवंतपणाचा भरघोंसपणें फायदा घेऊन तो अर्थीक परिणामकारक करतां येतो हें सिद्ध करणारा एक जादुगार !*



दोनतीन वर्षांपूर्वी मी एका प्रसिद्धीसंस्थेंत (साध्या शब्दांत सांगायचें म्हणजे जाहिरात कंपनींत) काम करीत होतों. कंपनीच्या मालकांच्या युरोप-अमेरिकेंतील बड्याबड्या चित्रकारांशीं, वास्तुशास्त्रज्ञांशीं आणि शिल्पकारांशीं ओळखी होत्या. आणि हे बडे लोक मालकांचे पाहुणे म्हणून भारतांत येऊन ठेपले, कीं आमच्या कंपनीला न चुकतां भेट देत.

लिओ लिओनी-हा १९५७ सालीं असाच आमच्या कंपनींत डोकावून गेलेला एक कलावंत. पहिल्या भेटींत त्याच्याविषयीं तुरळक माहिती आम्हांला मिळाली. 'फॉर्च्यून' या नांवाचें एक जाडजूड, सचित्र मासिक तुम्हीं पाहिलें असेल. अमेरिकेच्या औद्योगिक व आर्थिक प्रगतीला वाहिलेलें हें मासिक या विषयांत गम्य नसलेल्यांनीहि वाचावें, निदान चाळावें, इतकें मनोरंजक असतें. आणि याचें एक कारण म्हणजे त्यांतील मजकुराची व चित्रांची रचना आणि एकंदर छपाईचा रुबाब ! या विभागावर देखरेख करणारा माणूस म्हणजे लिओ लिओनी ! 'फॉर्च्यून' या मासिकाचा गेलीं दहाएक वर्षें तो आर्ट डायरेक्टर आहे.

दोनतीन वर्षांपूर्वी लिओनी जो प्रवासाला निघाला होता तो आपल्या मासिकाच्याच वतीनें, देशोदेशींचे देखावे आपल्या कॅमेऱ्यानें टिपण्यासाठीं. साबरमतीच्या तीरावर गुजराती रंगारी स्त्रियांनीं वाळत घातलेल्या रंगीबेरंगी पातळांचें लिओनीनें घेतलेलें रंगीत छाया-



अनुक्रमणिका

चित्र अजूनहि माझ्या लक्षांत आहे. 'फॉर्च्यून' मध्यें त्याचीं इतर जीं छायाचित्रें आलीं होतीं त्यांतहि वरवरच्या तांत्रिक कसबापेक्षां दृश्यविषयाचा रसरशीत जिवंतपणाच भरघोसपणें दिसत होता. जणु भारतांतील त्या अनोख्या दृश्यांचे नैसर्गिक रंगच त्या कागदावर आपोआप फुलून आले होते.

त्यानंतर पुढल्याच वर्षी, म्हणजे १९५८ च्या फेब्रुवारीमध्यें लिओ लिओनी आमच्या कंपनीच्या कलाविभागाचा सल्लागार म्हणून आमच्याबरोबर काम करायला आला. आमच्या कंपनींत येऊनजाऊन तो जेमतेम दीडएक महिना राहिला असेल. तेवढ्या अवधींत त्याच्या व्यक्तिमत्वाची आणि त्याच्या जाहिरातकलाविषयक विचारसरणीची एक झलक तेवढी आम्हांला अनुभवायला मिळाली. पण ही वानगीसुद्धां आमच्या दृष्टिकोनांत आरपार क्रांति घडवून आणायला पुरेशी होती !

लिओनीचा चेहरा इतर अमेरिकन लोकांच्या चेहऱ्याप्रमाणें गोलसर, किंबहुना थोडा गुळमुळीत, होता ! परंतु लिओनी हा



*graphic design*

मूळचा अमेरिकन नव्हे. त्याचा जन्म १९१० सालीं इटालींत झाला ! त्याचप्रमाणें तो मूळचा कलावंतहि नव्हे. जिनोआच्या विद्यापिठांतून त्यानें जी पीएच्. डी. मिळविली ती अर्थशास्त्रांत ! त्यानंतर दुसरें महायुद्ध सुरू होण्यापूर्वीच्या काळांत त्यानें चित्रकला आणि रचना (डिझायनिंग) या शास्त्रांचा अभ्यास केला. लवकरच मिलान या शहरांत त्यानें हाच व्यवसाय सुरू केला. याच काळांत इटालियन नियतकालिकांसाठीं त्यानें स्थापत्यशास्त्र, चित्रपट आणि कला या क्षेत्रांसंबंधानें लेख लिहायला सुरुवात केली.

• • •

लिओनी अमेरिकेंत आला तो १९३९ सालीं. फिलाडेल्फियाच्या एन्. डब्ल्यू. एयर ॲन्ड सन् या जाहिरात कंपनींत आर्ट डायरेक्टर म्हणून त्याची नेमणूक झाली. यानंतरच्या काळांत त्यानें ज्या जाहिरातींची रचना केली त्या अमेरिकेंतच नव्हे तर युरोपांतहि गाजल्या. त्यामुळें युद्ध संपल्यानंतर लिओनीची 'फॉर्च्यून' या मासिकाच्या कलाविभागाचा प्रमुख म्हणून नेमणूक झाली. एवढेंच नव्हे तर, ऑलिव्हेटी या सुप्रसिद्ध टाइपरायटर कंपनीनें आपल्या जाहिराती त्याचप्रमाणें इतर प्रसिद्धीसाधनें निर्माण करण्यासाठीं म्हणून त्याची खास योजना केली.

लिओनीची ही पार्श्वभूमि आम्हांला ओघाओघानेंच कळली. दररोज सकाळीं चहा घेत कंपनीच्या कामाची चर्चा करण्याचा आमचा रिवाज होता. लिओनीसुद्धां आमच्या या गप्पामंडळांत सामील झाला. सुरवातीलाच त्यानें आम्हांला स्पष्टपणें सांगितलें, कीं जरी आमच्या कंपनीच्या पुष्कळशा जाहिराती आपापल्या परीनें चांगल्या दर्जाच्या असल्या तरी कंपनीच्या एकंदर कामावर एकच एक असा ठसा कांहीं दिसत नाहीं. थोडक्यांत म्हणजे आमच्या जाहिराती आमच्याच कंपनीच्या अशी खूण पटविणारीं ठांशीव वैशिष्ट्यें त्यांत आढळत नाहींत ! प्रश्न असा होता, कीं केवळ एखाद्या जाहिरातदारासाठीं तयार केलेल्या तीनचार जाहिरातींच्या मालिकेंत दिसणाऱ्या सुसंगतीपुरतें आम्हीं समाधान मानणार, कीं आमच्या सर्वच जाहिरातदारांच्या कामाबाबत आमचा जो दृष्टिकोण आहे त्याला पक्कें तात्त्विक अधिष्ठान देणार ?

या संदर्भात जाहिरातींची रचना (डिझायनिंग) कशी काय करावी याबाबत लिओनीशीं आम्हीं दररोज चर्चा करीत असूं. एअर इंडिया इंटरनॅशनल या विमान वाहातुक कंपनीसाठीं आम्हीं कांहीं पोस्टर्स तयार केलीं होतीं. लिओनीचें म्हणणें असें पडलें, कीं जपान अगर ऑस्ट्रेलिया या देशांत एअर इंडियाचीं विमानें जात आहेत म्हणून पोस्टरांवर त्या त्या देशांचे देखावे आम्हीं रंगविले आहेत खरे. परंतु ही वाहतुक एक भारतीय कंपनी करीत आहे असें कांहीं त्या पोस्टरांद्वारें सूचित होत नव्हतें. थोडक्यांत म्हणजे आमचीं पोस्टर्सुद्धां भारतीय नव्हतीं ! खुद्द एअर इंडियानें 'महाराजा' हें पात्र निर्माण करून आपलें भारतीय व्यक्तिमत्त्व ग्राहकांच्या मनावर पुरेपुर ठसविलें आहे. लिओनी म्हणाला, कीं 'महाराजा' चें स्वरूप व्यक्तिशः मला आवडत नाहीं, परंतु जाहिरातीचा हेतू लक्षांत घेतां त्याची कामगिरी महत्वाची आहे यांत शंका नाहीं ! आज अनेक परदेशी प्रवाशी एअर इंडियाला ओळखतात ते 'महाराजा' मुळेंच !

• • •

जाहिरातीची रचना करणाऱ्याचें मुख्य काम म्हणजे जाहिरातीची मध्यवर्ती कल्पना अगर विषय निदान आपल्या मनांत तरी शब्दांकित करणें. म्हणजे जाहिरातीचा मजकूर लिहिणारा कॉपीरायटर, तिची रचना व सजावट करणारा आर्ट डायरेक्टर आणि ती जाहिरात जाहिरातदाराच्या गळ्यांत बांधणारा जाहिरात कंपनीचा अधिकारी या तिघांनाहि जाहिरातीचें मर्म काय आहे याची नीट कल्पना पाहिजे. ही कल्पना स्पष्ट असली, कीं रचना (डिझाइन) तिच्यातून आपोआप उमलूं लागते. आणि मग ही रचना वेगवेगळ्या शैलींत साकार होऊं शकते. कंपनीचा जो अधिकारी जाहिरातीचा आराखडा घेऊन जाहिरात-

## ज्ञा ने श्व र   ना ड क र्णी









अनुक्रमणिका

दाराला भेटावयास जात असेल, त्यानें जाहिरातदाराला त्या आराखड्याऐवजीं या मध्यवर्ती कल्पनेचीच गुणवत्ता पटवून दिली पाहिजे. आणि जाहिरातीचे पैसे भरणाऱ्या जाहिरातदाराला ही कल्पना ' विकण्यासाठीं ' मुळांत कंपनीच्या त्या अधिकाऱ्यालाच ती पुरेपूर पटलेली असली पाहिजे !

आमची कंपनी त्यावेळीं नव्यानेंच बाजारांत आलेल्या कांहीं द्रवरूप मसाल्यांची जाहिरात करीत असे. टाइम्समध्यें छापून आलेली, आम्हीं तयार केलेली, त्या मसाल्यांची एक जाहिरात लिओनीनें पाहिली. कलादृष्ट्या ती छानच होती, परंतु जाहिरात म्हणून ती कुचकामी होती ! लिओनीनें आम्हांला प्रश्न केला, ही जाहिरात कोणत्या प्रकारच्या वाचकांसाठीं तुम्हीं तयार केलेली आहे ? ज्याअर्थी मसाले ( मग ते द्रवरूप असोत किंवा कुटलेले असोत ! ) गृहिणी वापरणार त्याअर्थी ही जाहिरात स्त्रीवाचकांच्या डोळ्यांत भरणें इष्ट आहे ! स्वयंपाकशास्त्रांतला एखाद्या तज्ज्ञ माणूस जाहिरातीद्वारा आपण जर स्त्रीवाचकांच्या समोर उभा केला आणि तो जर वेळोवेळीं द्रवरूप मसाल्यांच्या सहाय्यानें कोणकोणते पदार्थ करतां येतील त्याची माहिती देऊं लागला तर हा जाहिरातीचा प्रकार किती आकर्षक होईल ?

यावर मीं लिओनीला असें सांगितलें, कीं इंग्लंडांत ज्याप्रमाणें हार्वेनसारखा विख्यात पाकशास्त्रज्ञ टेलिव्हिजनवर स्त्रियांना पाकशास्त्राचे धडे देतो त्याप्रमाणें सर्वमान्य असलेला असा पाकशास्त्रज्ञ आमच्या देशांत नाहीं !...हा प्रश्न एवढ्यावरच मिटला !

या द्रवरूप मसाल्यांच्या बाटल्यांसाठीं लेबल्स तयार करण्याचें काम आमच्यापुढें होतें. लिओनी म्हणाला, कीं हे मसाले कृत्रिम नसून परंपरागत कुटलेल्या मसाल्यांइतकेंच अस्सल आहेत हें गृहिणींना पटवून देण्याचें काम आपल्याला करावें लागेल. लेबलांवर आपण जर त्या त्या मसाल्यांच्या मूळ पदार्थाचें ( उदा. मिर्ची, लवंग, दालचिनी इ. ) चित्र काढलें तर कदाचित् हें काम सोपें जाईल !

म्हणून लिओनीनें त्या द्रवरूप मसाल्यांच्या कारखानदाराकडून या मूळ पदार्थांचे नमुने मागविले. ( इतके दिवस आम्हां कंपनींतल्या लोकांना मात्र हें सुचलें नव्हतें ! ) परंतु लवंग, दालचिनी, वेलची इत्यादि पदार्थांची चित्रें काढण्याचा जेव्हां प्रयत्न झाला तेव्हां मात्र चित्रांतले पदार्थ पटकन् ओळखतां येत नाहींत असें दिसून आलें ! ( वाचकांमधल्या चित्रकारांनीं रंग व कुंचला घेऊन दालचिनीचें चित्र काढून पाहावें ! ) एक मिर्ची तेवढी या संदिग्धतेला अपवाद ! !

कांहीं का होईना, मसाल्यांच्या मूळच्या स्वरूपाकडे आमचें लक्ष वेधलें तें लिओनीनें. अशा बऱ्याच कारखानदारांच्या मालाची जाहिरात कशी करावी याची लिओनीशीं आम्हीं चर्चा केली. या चर्चेतून आम्हीं त्या मालाविषयीं आणि तो माल वापरणाऱ्या (आमची त्या मालाची जाहिरात वाचणाऱ्या) गिऱ्हाइकांविषयीं बऱ्याच नव्या गोष्टी शिकलों.

• • •

पुष्कळदां आमच्या कंपनीच्या कलाविभागांत जे चित्रकार होते त्यांच्यापुढेंहि लिओनी रचनेच्या व सजावटीच्या तत्त्वांचीं प्रात्यक्षिकें देई. रंगरेघोट्यांनीं कागदावर करावयाची रचना म्हणजे एखाद्या भावनेचा अगर भावस्थितीचा आविष्कार होय, असें म्हणून त्यानें फळ्यावर तीन वेगवेगळ्या प्रकारच्या आकृत्या काढल्या. पहिली होती वरवर जाणारी एक जाळीदार रेषा ( स्पायरल ). दुसरींत दोन वक्र रेषा एकमेकांत गुंतल्या होत्या. तिसरींत वाकड्या तिकड्या रेषांचा गुंता होता.

या आकृत्यांकडे बोट दाखवून लिओनीनें विचारलें: राग, आनंद आणि दुःख या तीन भावना यापैकीं एकेका आकृतीतून व्यक्त केलेल्या आहेत. आतां कोणती आकृति कोणत्या भावनेची निदर्शक आहे तें ओळखा पाहू ! आमच्या चित्रकारांनीं चटकन् ओळखलें कीं वर जाणारी रेषा म्हणजे आनंद, दोन वक्र रेषा म्हणजे दुःख आणि रेषांचा गुंता म्हणजे राग ! इथे एकेक केवलरूपवादी ( ॲबस्ट्रॅक्ट ) कल्पना केवलरूपवादी स्वरूपांतच व्यक्त केलेली होती. या भावनांची भिन्नता जास्त स्पष्ट व्हावी म्हणून रंगाचाहि उपयोग करतां येण्यासारखा आहे. उदा० रागासाठीं लाल रंग अगर दुःखासाठीं निळसर रंग.

याच अनुषंगानें लिओनीनें असें सांगितलें कीं वरवर जाणारी जाळीदार रेषा मी खालून वर काढण्याऐवजीं वरून खालीं काढली असती तर याच आकृतीला ' दुःख ' असें म्हणायला कांहींच हरकत नव्हती ! भावनांचें हें दृश्य रूपांतर मानवी आविर्भावांना धरूनच आहे. उदा० आनंद झाला कीं आपण उड्या मारतों — म्हणजे वरवर जातों. रागानें आपण थैमान घालतों म्हणजे रेषांचा गुंता करतों. "रागानें लालबुंद होणें" "आनंदानें नाचूं लागणें" हे वाक्प्रचारसुद्धां भावनांच्या या मूर्त स्वरूपाचेच निदर्शक आहेत. दुःखी असणें या अर्थी इंग्रजींत "हॅविंग द ब्ल्यूज" असाच वाक्प्रचार आहे !

दुसऱ्या एका प्रात्यक्षिकांत लिओनीनें फळ्यावर एक चौकोन काढला आणि जमलेल्या चित्रकारांना म्हटलें: या चौकोनांत एक बिंदू असा ठेवायचा कीं ज्यामुळें नेतृत्व, अधिकार यांसारखी कल्पना सूचित होईल. दोन वेगळ्या दृष्टिकोणांतून हें करतां येईल; कांहीं चित्रकारांना तो चौकोन म्हणजे द्विमितिपर पृष्ठभाग तेवढा वाटेल, आणि अधिकाराची वा नेतृत्वाची कल्पना सुचविण्यासाठीं ते तो बिंदू चौकोनाच्या मधोमध जाणाऱ्या एखाद्या कल्पित रेषेवर वरच्या बाजूला ठेवून देतील. परंतु कांहीं चित्रकार हा चौकोन म्हणजे एखाद्या घनावकाशाचा ( क्यूबिक स्पेसचा ) क्रॉस सेक्शन आहे असेंच मानतील, आणि तो बिंदू या त्रिमितीपर जागेच्या ' डोईवर ' मधोमध——म्हणजेच पर्यायानें त्या चौकोनाच्या नेमक्या केंद्रस्थानीं-ठेवून देतील. अशा रीतीनें डोईवर, म्हणजे अधिकाराच्या जागीं, कोणी असल्याचें सूचित होईल.

वरील आकृतींत कोणत्याहि दृष्टिकोणांतून पाहिलें असतां समाकारतेचें ( सिमेट्रीचें ) तत्त्व आपल्याला दिसेल. आणि जेथें अधिकार किंबहुना हुकूमशाही सूचित करावयाची असते त्या वास्तूंत हें समाकारतेचें तत्त्वच अंगिकारलेलें आपल्याला दिसेल. उदा० सरकारी इमारती, राजवाडे, इत्यादि. आजच्या लोकशाहीच्या युगांत मात्र रचनेच्या सर्व क्षेत्रांत——जाहिरातीपासून तें






स्थापत्यापर्यंत--समाकारतेचें तत्त्व झुगारून दिलेलें दिसेल.

• • •

अशा प्रकारची वरीचशी चर्चा लिओनीनें आमच्या चित्रकारांसमवेत केली. तिचा नुसता गोषवारा जरी दिला तरी तो रचनाशास्त्रावरील एक प्रबंध होण्याचा संभव आहे. लिओनीचें मुख्य सूत्र एवढेंच होतें कीं अभिजात चित्राप्रमाणें रचनाकृति अगर चित्ररूप जाहिरातसुद्धां भावनेचाच आविष्कार असते. ज्या वस्तूची जाहिरात करायची तिच्याविषयींची एक विशिष्ट भावना जाहिरातींतील चित्रांतून, तिच्यांतील मजकुरांतून आणि तो मजकूर छापण्यासाठीं निवडलेल्या टाइपांतून व्यक्त होत असते. उदा० 'सुस्वागतम्' नांवाची घोषणा जरी रंगवायची असेल तरी ती चांगली ऐसपैस रंगविली पाहिजे. ती वाचल्यावर कोणीतरी दुर्मुखलेला प्राणी तोंडांतल्या तोंडांत 'सुस्वागतम्' असें पुटपुटतो आहे असें वाटण्याऐवजीं प्रसन्न चेहऱ्याचा कोणी भलाभक्कम माणूस तोंडभर हंसून 'सुस्वागतम्' असें म्हणतो आहे असें वाटलें पाहिजे. चित्रांकरवींच नव्हे तर शब्दांकरवी आणि त्या शब्दांसाठीं योजलेल्या टाइपांच्या कमीअधिक जाडीकरवीं अगर लपेटीच्या डौलाकरवीं भावना व्यक्त करणें शक्य आहे, इष्ट आहे हें लिओनीनें आम्हांला शिकविलें.

१९५८ सालच्या नोव्हेंबरांत अमेरिकेंतील मॅसेच्युसेट्स् संस्थानांतील वोर्स्टर या शहरांतील आर्ट म्युझियमनें लिओ लिओनीच्या कलाकृतींचें एक प्रदर्शन भरविलें होतें. त्याचे तीन विभाग होते. एक जाहिरात-रचना (ग्राफिक डिझाइन), दुसरा रचना व सजावट आणि तिसरा रंगचित्रें व रेखाचित्रें. एकूण लिओनीच्या विविधतापूर्ण कलेचे साठएक नमुने तेथें मांडलेले होते—आणि हें प्रदर्शन पन्नास दिवस चालू होतें.

वरील सर्व क्षेत्रांमध्यें सारख्याच कौशल्यानें वावरणारा लिओनी म्हणतो, "चित्रकार या दृष्टीनें माझीं मूल्यें स्थायी स्वरूपाची आहेत. माझ्या आंत खोलवर त्यांचा मागोवा घ्यावा लागतो—जेथें माझी नागडीउघडी अस्मिताहि आहे आणि ज्यामुळें मला

(पान ४० वर)









# अंतर

ऑफिसांत वाऱ्यासारख्या पसरलेल्या त्या बातमीनें अनंताला आभाळ अगदीं ठेंगणें वाटूं लागलें. ती बातमी केव्हां एकदां अनूला सांगूं असें त्याला होऊन गेलें. आज चार वर्षें झालीं. दरवर्षी रिझल्ट वाईट लागत होता. पण आज तो ऑफिसांत शिरतांच मित्रांनीं नुसता कल्लोळ करून सोडला. ऑफिसच्या डिपार्टमेंटल परीक्षेंत तो पास झाला होता—कधीं नव्हे तो त्याचा नंबर लागला. कुणी म्हणायचे, "छोडो यार, सगळी वशिलेबाजी असते." त्यानेंहि ठरवलें होतें—आतां फक्त एकदांच. हा शेवटचा चान्स—नशिबाची परीक्षा. त्याचा मुळीं कानांवर विश्वासच बसेना—पण चक्क पेपरवर त्याचें छापील नांव होतें. आतां पुढच्याच महिन्यांत त्याला ती वरची पोस्ट मिळणार होती. मग काय, पैसेच पैसे—नो वरी! कटाकटी मिळणाऱ्या पगारांत अनू किती काटकसरीनें सगळें बसवायची. पैशांचा वन् वे ट्रॅफिक आणि त्याला फुटणारे खर्चाचे अनेक फाटे—पुरुषांची एकमार्गी यातायात! अनूनें कांहींतरी मार्ग काढण्यासाठीं घेतलेला शिवणाचा कोर्सः...

चुकून त्यानें घराकडे सायकल वळविली आणि त्याला एकदम आठवलें—अनूला हॉस्पिटलमध्यें पोंचवून आज आपण ऑफिसांत आलोंयू!

हॉस्पिटलच्या दारांत शिरतांशिरतां कोंवळें रडणें ऐकूं आलें. त्याला वाटलें—ह्यच कीं काय आपला रिझल्ट? पण नर्स गोड हंसून म्हणाली, "अजून तासभर तरी लागेल. वाटल्यास जरा वेळानं या—"

पण उन्हांतून आल्यासरसा अनंत तिथेंच एका खुर्चीवर टेकला. त्याला वाटलें असें जावें आणि अनूला हृदयाशीं धरून ही गोड बातमी सांगावी. पण त्या खोलींत आपल्याला एका पुरुषाला कसली जाऊं देणार ही नर्स! अनू बिचारी तिकडे तळमळत असेल, यातना सोशीत असेल. आपण मात्र नवरा असून...

तेवढ्यांत शेजारच्या बाकावर चघळलें जाणारें संभाषण—च्युइंगगमसारखें—त्याला अर्धवट कांहींतरी ऐकूं आलें—बेळगांवचें काय होणार—गोवा, काश्मीर—न संपणारी मालिका

आणि त्याच्या मनांत चुकून त्याच सांच्यांतलें वाक्य ओरडलें—या खेपेस मात्र मुलगा झालाच पाहिजे...झालाच पाहिजे...आणि नाहीं झाला तर? अनूला फारफार वाईट वाटेल. दिवसरात्र उबवलेलें तें स्वप्न...आतां फक्त तासभर...मग अर्धा तास...मग दहा मिनिटं...पण मुलगा होईल ना—कीं नुसता सगळा सस्पेन्सच...

चित्राच्या वेळींहि असेंच वाटले होतें. पण तेव्हां पहिलेंवहिलें, सगळेंच कौतुक वाटलें. मुलगा काय अन् मुलगी काय...मग चित्राच्या पावलावर पाऊल टाकून रेखा आली...पण यावेळीं मात्र सगळे आराखडे ठरवले गेले होते. आंखीवरेखीव पगार—आटोपशीर संसार...एकदां मुलगा झाला कीं संपलें-संपवायचें होतें.

**त्याचा मेंदू झिणझिणला–आणि–क्षणांत–मनांतलें त्या बातमीचें स्वारस्य संपलें–शुष्क झालें. स्ट्रॉनें ऑरेंज शोषून घेतल्यावर ग्लास दिसतो तसें...त्याला वाटलें तिकडे अनूला मुलगी झालीय्...त्याचा गळा पकडून मन किंचाळलें, "अनूला—अनूला अं? आणि तूं कोण??..........."**

सौ. अंजलि ठक्कार

काल रात्रीं कुटलेले ब्रिज...पिटलेले विनोद...खेळतांना सहज विषय निघाला तेव्हां तो म्हणाला होता, "आतां एकदां मुलगा झाला म्हणजे बरें बुवा. सर्कल कंप्लीट होईल." कुणी तरी टाळी देऊन म्हणालें होतें, "मग व्हल्वरेबल् झालांत कीं कॉशसूली खेळायला हवें हां-सांभाळून!" हंसण्याच्या गडगडाटांत त्याच्या मनांत आलें, "पण मुलगीच झाली तर?" मग व्हल्वरेबल्-रीडबल्ड्–म्हणजे पगारांत खच्चून 'डाऊन्स्'. आणखी वीस वर्षांनीं विम्यांतून वाहणारा धो धो हुंडा. हंसतां हंसतां डसल्यासारखा त्याचा चेहरा पडला होता...

कालच्या जागरणानें त्याला कडकडून जांभई आली. म्हणजे पुन्हां तेंच सगळें. तेंच चान्स घेणें-खेटे घालणें-फेऱ्या-वाऱ्या-चित्रा-रेखा...सगळें तेंच. तसेंच. अगदीं कार्बन कॉपी.

रिस्टवॉचकडे पहातां पहातां उगीचच त्याच्या मनांत अशुभ आलें—अनूचें सगळें नीट होईल ना......पहिल्यांदा चित्राच्या खेपेला अनू माहेरीं गेली तेव्हां तो असाच केव्हां केव्हां अस्वस्थ व्हायचा. एकदां तर आठवडाभर तिचें पत्र आलें नाहीं म्हणून त्यानें तारच ठोकली होती. जरा तिच्या पत्राला उशीर झाला कीं त्याला वाटायचें, कांहीं वेडेंवांकडें झालें काय—पत्र कां नाहीं अनूचें?... बाळंतपणाला ती माहेरीं गेली आणि घर मुळीं रिकामेंच झालें. खायला उठलें. त्यावेळीं प्रथमच त्याला तिचे जबर अस्तित्व जाणवलें होतें. साड्या, ब्लाऊझ, सेफ्टीपिन्स–केव्हांहि पहा—घर कसें भरलेलें दिसायचें. ती गेल्यावर मग तो रात्रीं केव्हांहि यायचा. केव्हांहि उठायचा. चहाच्या कपबशा दोन दोन दिवस पडलेल्या राहायच्या. हँगरवर लोंबणाऱ्या पँट्स्, रुमालांचे बोळे, उस्कटलेली चादर, तेलाची उघडी बाटली, टॉवेलचा ओला बोळा...आणि मग तो तिला पत्र लिहायचा—ओथंबलेलें--उताटलेलें. अशी सही करायचा--जसा झोकांत तिच्या कमरेभोंवतीं हातच टाकतोय्! मग तिचेंहि उत्तर यायचें—तीच वाक्यं--तेच ओल्या थेंबासारखे टपटपणारे शब्द—गुलाबपाण्यासारखे सुवासिक...सगळीं एकत्र ठेवलेलीं पत्रें परवां त्यानें सहज चाळलीं होतीं. तिचीं...त्याचीं... रंगसफेतीनंतर घर आवरतां आवरतां. आणि त्याला हंसूं आलें. किती तेच शब्द...पुन्हां पुन्हां रिपीट होणारे. पण तरीहि कंटाळवाणे न वाटणारे. ब्रिजच्या डावांसारखे. तेच बावन पत्ते - कधीं आपल्याकडे असतात—कधीं पार्टनरकडे—कधीं ऑपोनंट्स्कडे. पण रंग कसा भरतो. दरवेळीं वाटतें, असा डाव कधीं रंगला नव्हता...

अनू असेच क्षणोक्षणीं त्याच्या मनांत रंग भरत होती. स्वतःचाच क्षणभर त्याला हेवा वाटला. मनाशीं तो पुटपुटला--अनूला आतां खूपखूप सुखांत ठेवायचें. कुठेंतरी लांब प्रवासाला जायचें तिच्या कधींपासून मनांत आहे. रेखाला सांभाळायला बाई ठेवायची, चित्राला मॅांटेसरींत अडकवून टाकायचें. आतां एक अनूची बहीणच गांवांत आहे म्हणून बरें--नाहीतर अशा वेळीं त्या छचकड्यांकडे कुणीं पाहिलें असतें...

झिणलेल्या डोक्यांत पुन्हां ती मघांची आठवण झुळझुळली. पास झाल्याची. आणि त्या आठवणीनें त्याला अगदीं गुदगुल्या झाल्या. लहानपणीं पहिल्यांदांच जत्रेंत आईसफ्रूट खाल्लें तशा चवीनें ती आठवण तो घोळवूं लागला —या योगायोगाची त्याला मोटी गंमतच वाटली—नेमका इकडे आपल्या परीक्षेचा रिझल्ट लागावा, आणि तिकडे अनूचाहि रिझल्ट. चार वर्षं आपण परीक्षेसाठीं झगडलीं. मध्येंच पीएच्. डी. चा एक प्रयत्न केला. तेवढेंच क्वालिफिकेशन्... पण त्याचे दोन पेपर्स प्रसिद्ध झाले आणि समजलें कीं त्याच विषयावर दुसऱ्या कुणीतरी नुकतीच डिग्री मिळवलीय्. तें समजलें त्या दिवशीं किती एवढासा झाला होता तो. अनूदेखील त्या अपयशानें अगदीं वेडीपिशी होऊन गेली. अगतिकपणें ती म्हणाली होती — "असें कसें झालें हो...असें कसें झालें?" त्याचे सगळे श्रम फुकट गेले होते. पण अनू अशी अस्वस्थ झाली होती कीं जणुं त्या दोघांचे मिळून कांहींतरी हरवलें होतें...

विचारी अनू...तिकडे यातनांशीं झगडत असेल. आपली ती परीक्षा अन् तिची ही परीक्षा. सगळे शेवटीं एकच. असेंच आयुष्यभर झगडायचें कीं काय? क्षणभर त्याला वाटलें या सगळ्यापासून पळून जावें...दूर दूर. दूर कुठें तरी स्वच्छंदीपणानें भटकावें. काय हें! वर चढण्यासाठीं लटपटी खटपटी, नोकरी-प्रॉव्हिडंट फंड-पेन्शनेबल जॉब—केवढी यातायात. आणि शेवटीं मग पैसे जमवून प्रवास करायचा. सगळें विसरण्यासाठीं यात्रा. मग ती यातायात–स्लीपिंग बर्थचें रिझर्व्हेशन, रेस्टहाऊसमधल्या खोलीसाठीं ॲडव्हान्स, सतरांदा खेटे, वशिले...

किती क्षुद्र, किती एवढेंसें असतें सगळें. एक बॉंब पडला—नुसता हवेंत एक बॉंब पडला, तर क्षणांत सगळें बेचिराख होऊन जाईल. चिमूटभर राख होईल या आयुष्याची. मारे पैसे जमवून घरें बांधायचीं-पण नुसत्या भूकंपाच्या धक्क्यानें...

पण त्याक्षणीं भूकंप होत नव्हता...फक्त नर्स त्याच्याजवळ येऊन सांगत होती, "तुम्हांला छोकरी झाली बरं कां, छोकरी!"

अनंत हादरला...सांवरून त्यानें विचारलें, "म्हणजे मी आतां आंत जाऊं शकतो ना?"

हंसत हंसत नर्स म्हणाली, "हो, अगदीं जरूर. पण हें बघा, पांचच मिनिटं हं—त्यांना सारख्या घेऱ्या येताहेत. ग्लानींतच आहेत त्या."

अनूच्या कॉटजवळ जातां जातां तो गडबडला. अनूशीं काय बोलायचें...तिला कसें सांवरायचें...त्याला वाटलें, फुकट गेली










## हिमालय भारताचाच

हिमालय हिंदुस्थानचाच आहे, दुसऱ्या कोणत्याहि देशाचा नाहीं, हें सिद्ध करण्यासाठीं हिमालयाच्या उत्तरेकडे सांडणाऱ्या पाण्याचा एकूण एक थेंब गोळा करून ते सर्व हिमालयाच्या दोनहि टोंकांना प्रदक्षिणा घालून हिंदी महासागरापर्यंत पोंचविण्याचें काम सिंधु आणि ब्रह्मपुत्रा ह्या दोन नद्या—नद करीत असतात.

श्रीकैलासनाथानें भारतवर्षाला आपल्या छातीशीं धरण्यासाठींच जणूं काय हे दोन कारुण्यबाहु पसरले आहेत! हिमालयाचें आडवें येणें सहन न झाल्यामुळेंच कीं काय सतलज व घोग्रा त्या नगाधिराजाच्या कुशींतूनच सरळ वाट काढून मानससरोवराचें पाणी भारतवर्षांतील दोन मोठ्या प्रांतांना पुरविण्यासाठीं आणतात. गंगा, यमुना व त्यांच्या असंख्य मैत्रिणी तेंच काम वडिलांचा मान राखून या बाजूस करतात. पंजाबच्या पांच नद्या आणि संयुक्त प्रांतांतील पांच नद्या मिळून दाही जणी भारतवर्षाची समृद्धि दसपट करतात. या दहाहि नद्या भारतीय आहेत. फक्त सिंधु व ब्रह्मपुत्रा यांना अतिभारतीय म्हणजे भारतापलीकडून येणाऱ्या म्हणतां येईल.

"लोकमाता"—काकासाहेब कालेलकर

ही आनंदाची बातमी. फुकट गेला आजचा दिवस.

अनूच्या कपाळावर हात ठेवून स्वतःच्या नकळत तो बोलत होता—सुचेल तें. कुठल्यातरी लांबच्या दरींतून ऐकूं यावेत तसे दबलेले, क्षीण हुंदके...अनू मुळीं त्याच्याकडे बघायलाच तयार नव्हती. कॉटला बांधलेल्या पाळण्याकडे ओझरतें पहात तो म्हणाला, "नेव्हर माईंड अनू. त्यांत काय अग...आपण काय करणार. चान्स आहे तो—केवळ चान्स." पण त्याला पुरतें समजलें होतें—तिच्याइतका त्या दुःखाजवळ, धक्क्याजवळ तो पोंचूच शकत नव्हता. निदान आज तरी—या क्षणीं. तितकी धग कांहीं त्याला जाणवत नव्हती.

त्याचा बधिर मेंदू कुचकुचला—आपलें पीएच्. डी. चें फिसकटलें तेव्हां अनूतरी कशावरून आपल्याइतकी त्या धक्क्यापर्यंत पोंचली होती...कशावरून, कशावरून? शेवटीं प्रत्येकाचें अस्तित्व निराळेंच. सुखदुःख निराळेंच...

सायकलवर टांग मारतां मारतां त्याला वाटलें, अनूला आपली ही बातमी आतां सांगतां आली नाहीं तेंच बरें झालें. थोडावेळ ग्लानीचा पडदा बाजूला झाला असता, आणि हंसरें नाटक आपल्याला दिसलें असतें. मग पुन्हां तेंच दुःख, तेंच रडगाणें. घरघरणारें... गरगरणाऱ्या जात्यासारखें ..

लक्कन् वीज चमकावी तसा क्षणांत तो तार ऑफिसच्या इमारतीपाशीं थांबला. उडणारें हृदय धगधगलें. ऑफिसांत समजलेली ही आनंदाची बातमी कुणाला तरी कळलीच पाहिजे...कुणाला तरी समजलीच पाहिजे. त्याशिवाय नाहीं सार्थक वाटायचें. बाबांना किती आनंद होईल! तारेनें समजलें म्हणजे त्यांच्या एकटेपणांत केवढा आनंद. शेतावरच्या सगळ्या खंडकऱ्यांना मग ते पेढें वाटतील.

---

(पान २३ वरून चालू)

"कांहीं नको. डॉक्टर काय सांगणार कपाळ?" आप्पा हातघाईवर येऊन ओरडले.

"पण पुरळ कशामुळें आला?" नंदाचं मन ताणूं लागलं.

"तुला कसला संशय आहे?" आप्पांनीं धीर करून विचारलं.

"अनरशामुळें..."

भयाण अंधारांत अकस्मात कांहीं तरी लखकन् दिसावं तशा तऱ्हेनं आप्पा म्हणाले, "ग्रहणादिवशीं अनरसे खा! शंभर वेळां सांगितलं—कृपा करून ग्रहण सुटेपर्यंत कांहीं करूं नका म्हणून. पण म्हाताऱ्याचं ऐकतो कोण..."

आप्पा कडवटपणें बोलले. पण कुणाच्या मनाला तें लागलं नाहीं. कारण अपघाताचं निदान झालं. प्रसंगाचं कारण कळलं. ताणलेलीं मनं सैल पडलीं. सोवळं एकदाचं खुंटीवर टांगलं गेलं.

"अनरसा हा असा अंगावर उठला!" शिक्कामोर्तब करण्यासाठीं आप्पांनीं तेंच निधान पुनः पुनः उगाळलं.

पण तरीहि त्यांच्या डोळ्यांत पाणी झिरपलं. मनाला होत असलेली यातनांची कळ टचटचीत झाली.

मग खुर्चीवर पाठीमागं मान टाकून ते बराच वेळ निपचित पडून राहिले.

—आणि मग एकदम त्यांना दचकून जाग आली. ते खाडकन् उठून उभे राहिले, नि म्हणाले, "काय झालं?"

"डॉक्टर इथं येत होते. पण मागं गेले." नंदा म्हणाला.

"डॉक्टर आले?" त्यानीं विचकून विचारलं.

"येत होते. पण तुम्हांला बघून परत गेले!"

"मला बघून?...अं?...पण गेले ना?...जाऊं देत!"

नंदाला वाटलं, डॉक्टर आले असते तर बरं झालं असतं. खुद्द त्यांनाच विचारून काय ती शहानिशा करून घेतां आली असती.

"बोलवूं?"

"कशाला?" आप्पा एकदम तडकले.

नंदा बोटं चोळीत उभा राहिला.

"हिला आज घरीं नेणार मी..." तर्जनी परजीत आप्पा म्हणाले, "नर्स घरीं येईल. आणखी दहा दिवस या नरकांत थांबण्याची गरज नाहीं...काय?...तूं घरीं जाऊन तयारी कर..."

नंदा बाहेर पडतांच त्यांचा लोंबकळत राहिलेला जीव खालीं आला. खांदे गळवून त्यानीं आपले दोन्हीं हात कोटाच्या खिशांत घातले.

खिशांत ठेवलेल्या, देवावरील फुलांचा ओलसर स्पर्श होतांच त्यांच्या अंगावर एकदम कांटा उभा राहिला

• • •







अनुक्रमणिका

मुलगा पास झाला म्हणून. आतां पगार, वाढणार म्हणून... पुन्हा त्याचें हट्टी मन फिसफिसलें—पण मग ही दुसरी बातमी—अनूची.. ती नको. ती कळवतां येईल सावकाश—कार्ड टाकून. त्या बातमी चें प्रेमाचं तकी यायला या गोड बातमीवर. दोन्हीं बातम्या एकदम कळल्या म्हणजे वाबाहि तेंच रडगाणें दळत बसतील. घरघरणारें... गरगरणाऱ्या जात्यासारखें...

पाकीट चांचपत त्यानें शब्द जुळवले, आणि ती गोड बातमी पुन्हां एकदां मेंदूवर आदळली. मेंदू झिणझिणला. ती बातमी कागदावर लिहिली गेली—आणि क्षणांत-क्षणांत-मनांतलें त्या बातमीचें स्वारस्य संपलें. शुष्क झालें. स्ट्रॉनें ऑरेंज शोषून घेतल्यावर ग्लास दिसतो तसें...त्याला वाटलें, आपण कांहींतरी गुन्हा करतोंय्. तिकडे अनूला मुलगी झालीय्..त्याचा गळा पकडून मन किंचाळलें, "अनूला—अनूला अं ? आणि तूं कोण...तूं कोण ??"

स्वतःचेच ते शब्द त्याला झोंबले. वाटलें, केलेली तार त्या कोरकुनाकडून हिसकावून घ्यावी. काय मोठा आपण पुरुषार्थ गाजवला—एक यःकश्चित् परीक्षा पास झालों !......एक यःकश्चित् परीक्षा ! आणि अचानक एका विलक्षण संतापानें त्याचें डोकें भणाणून गेलें. रात्र-रात्र जागरणें करून केलेला अभ्यास, चित्ररेखांच्या खाऊ-खेळण्यांत सुद्धां काटकसर करून भरलेली फी, आणि आतां हें क्षुद्र यश ! कुणास ठाऊक, हें सांगितल्यावर अनूनें मधाशीं हंसरें नाटक तरी केलें असतें कीं नाहीं तें.

### ते सोन्याचे दिवस



मी करतों आठवण
त्या दिवसांची
जेव्हां तूं मला अजून
भेटायची होतीस
कसे होते ते दिवस
सोन्यासारखे !
नव्हती कसली काळजी
नव्हती कसली विवंचना
मन कसें होतें
हलकेंफुलकें
सावरीच्या पिसासारखें !

मघांचा तिचा तो क्षीण चेहरा...खोल दुरीतून आल्यासारखे दबलेले हुंदके...अनूपासून आपण किती लांब चाललों आहोंत... किती लांब...किती......

● ● ●








अनुक्रमणिका



*ह्या प्रदेशांतले लोक मागासलेले आहेत, हें खरें आहे. पण त्यांचीं नृत्यें पहात असतांना, मला तरीं पाश्चात्य पद्धतींच्या 'बॉलरूम' किंवा 'कॅबरे' नृत्यांचीं आठवण झाल्याशिवाय राहिलीं नाहीं. हे लोक अर्धनग्न, आणि 'सुधारलेले' पाश्चात्य लोक सुशिक्षित आणि शानदार कपडे घालणारे आहेत, एवढाच काय तो फरक! त्यांनीं तीं नृत्यें ह्या आदिवासी लोकांपासून तर चोरून घेतलीं नाहींत ना, असें क्षणभर वाटलें!*

---

महाराष्ट्राच्या पूर्वेकडील सीमेलगत, कांहीं मैलांवरच, एक निसर्गरम्य सुंदर नंदनवन वसलेलें आहे, याची किती लोकांना कल्पना आहे? आदिवासी लोकांचें हें सुंदर नंदनवन आहे. 'बस्तर' हें ह्या नंदनवनाचें नांव. हें पूर्वीं संस्थान होतें; परंतु स्वातंत्र्योत्तर काळांत, इतर संस्थानांप्रमाणें बस्तरचेंहि विलीनीकरण झालें. हा प्रदेश आतां नव्या मध्यप्रदेशांत गेला आहे. बस्तर ही आफ्रिकेची छोटीशी प्रतिकृति आहे, असें म्हटल्यास हरकत होणार नाहीं. परंतु हें विधान करीत असतां, आफ्रिकेच्या जंगलांतील 'रानवटपणा' तेथें नाहीं किंवा जंगलाचें नांव उच्चारतांच, डोळ्यासमोर उभें राहणारें भीषण चित्रहि तेथें दृष्टीस पडणार नाहीं. बस्तरमधील लोकांसंबंधीचीं अनेक वर्णनें मी ह्यापूर्वीं अनेकदां ऐकलीं होतीं; पण तेथील आदिवासी जनतेचें पहिलें दर्शन घेण्याचा योग, स्वातंत्र्योत्तर काळांतील पहिल्या दसऱ्याच्या दिवसांत आला. त्यानंतर नुकताच पुन्हां एकदां मी तेथें जाऊन आलो.

बस्तरला जाण्यासाठीं आम्हीं मोटारनें निघालो, तों प्रथम रायपूरला जाऊन पोचलो. बस्तरला जावयाचें झाल्यास, रायपूर तें जगदलपूर हा एकच रस्ता आहे. पूर्वीं असलेलें एवढें मोठें संस्थान; पण तेथें जाण्यासाठीं केवळ एकच रस्ता असलेला पाहून कोणालाहि आश्चर्य वाटेल. बस्तर संस्थानांत राज्य करणाऱ्या राज्यकर्त्यांची इच्छा, संस्थानाशीं बाहेरच्या जगाचे संबंध असूं नयेत अशी होती आणि म्हणूनच त्यांनी ही दक्षता घेतली असावी. संस्थानाच्या विलीनीकरणापूर्वीं, मद्रासपासून तों जगदलपूरपर्यंतचा दुसरा रस्ता तयार करण्याची योजना आंखण्यांत आली होती व थोडेसें कामहि सुरू झालें होतें. परंतु हा नवीन रस्ता अद्यापहि तयार झालेला नाहीं आणि निकटवर्ति भविष्यांत तो तयार होण्याची आशाही नाहीं. आगगाडीचा मार्ग तर तेथून पावणेदोनशें मैल दूरवर आहे. वाहतुकीच्या अभावामुळें तेथील प्रगति कमालीची खुंटली आहे. संस्थानिकांची एकंदर मनोवृत्ति सर्वपरिचित आहे आणि त्या मनोवृत्तीला अनुसरूनच, बस्तरचें संस्थान, जाणून बुजून बाहेरच्या जगापासून अलिप्त ठेवण्याचा प्रयत्न करण्यांत आला असावा. रायपूर ते जगदलपूर रस्त्याला समांतर अशी एक छोटीशी रेल्वेलाईन तयार करण्यांत आली आहे. परंतु हा लोहमार्ग ३० ते ४० मैलांचा असून, तो धमतरीपर्यंतच गेला आहे. गंमतीची गोष्ट ही कीं, रायपूर ते धमतरीपर्यंत लोहमार्ग असला, तरी ह्या दरम्यानच्या प्रवासाला तब्बल आठ तास लागतात–म्हणजे ह्या आठ तासांत एखाद्या दुसऱ्या लोहमार्गानें नागपूरपासून तों थेट भुसावळपर्यंत किंवा भोपाळपर्यंतचा सुद्धां प्रवास सहज होऊं शकतो. त्या दृष्टीनें, जगदलपूरला जाण्यासाठीं धमतरीपर्यंतचा लोहमार्ग अवलंबण्याचा खटाटोप कोणताहि शहाणा प्रवासी करीत नाहीं– रायपूरला आल्यानंतर मोटारबसनें सरळ जगदलपूरकडे जाणें त्याला परवडते आणि तें सोयीचेंहि आहे. नागपूरहून आम्हीं जे निघालों तें रात्रीं रायपूरला पोंचलो. तेथें रात्रभर विश्रांति घेतल्यानंतर दुसरें दिवशीं सकाळीं जगदलपूरला जाण्यास निघालो.

रायपूर ते कांकेरपर्यंतचा रस्ता कमालीचा एकाकी आहे. कांकेर हेंहि पूर्वीं संस्थान होतें. कांकेरचे डोंगर दृष्टीस पडूं लागतात त्या वेळीं ह्या एकाकीपणाचा विसर पडूं लागतो. कांकेर छोटेसेंच असलें, तरी बरें आहे. येथूनच आदिवासी लोकांच्या वसाहतींची सुरुवात होते. गोंड लोकांची संस्कृति येथें पूर्वापार चालत आली आहे. कांकेरच्या सरहद्दींतील पहिल्या काळ्याशार डोंगराजवळून आपली





अनुक्रमणिका

# गोंडवनांतील किशोरी




यशवंत शास्त्री

मोटार जाऊं लागते. डोंगराच्या सुळक्यावर असलेले काळे कुळकुळीत प्रस्तर, आपल्या प्रचंड स्वरूपाकडे, जाणारा-येणारांचें लक्ष वेधून घेतात. हें प्रचंड गुळगुळीत प्रस्तर, डोंगराच्या सुळक्यावरून न घसरतां, वर्षानुवर्षें तेथें कसे जमून बसले आहेत, ह्याचें आश्चर्य वाटते. ह्या डोंगराजवळ आल्यानंतर मात्र, पूर्वीचें रखरखीत स्वरूप पालटतें आणि हिरवीगार गर्द झाडी व भाताची हिरवीगार शेतें विपुल प्रमाणांत दिसूं लागतात. अधुनमधून रस्त्याच्या दुतर्फा मोठमोठीं तळीं आहेत. त्या तळ्यांत पांढऱ्या व लाल रंगाचीं कमळें उगवलेलीं दिसतात. येथून नंतरचा प्रवास रमणीय आहे. बस्तरच्या पठाराकडे जसजसा प्रवासी जाऊं लागतो, तसतसें निसर्गाचें गोड संगीत त्याला अधिकाधिक जवळ ऐकूं येऊं लागते. तीं कमळाचीं फुलें आणि हिरवीगार रानें पाहूनच, पुढें येणारा 'गोंड-किशोरीं'चा देश कसा असेल ह्यासंबंधीचा विचार करण्यांत मन रंगून जाते. आम्हीं जसजसें पुढें जाऊं लागलों, तसतशी माझी अधिरता वाढूं लागली. पण अधिर होण्यांत स्वारस्य नव्हतें. थोड्याच वेळांत आम्हीं त्याच सुंदर देशांत जाऊन पोंचणार होतो. काळ्या दगडाचे लांबट असलेले, सुळके असलेले डोंगर हा ह्या प्रदेशाचा विशेष होय. सभोंवतीं पसरलेल्या हिरव्यागार रानाचें रक्षण करण्यास, हे पर्वताचे काळेकभिन्न सुळके पहारा देत उभे आहेत. जणूं काय, बस्तरमधील निसर्गदत्त आणि मानवी सौन्दर्य ह्यांचें रक्षण करण्यासाठी, निसर्गानें हे लांब सुळक्याचे पहारेकरी उभे केले आहेत! – आणि आपण जसजसे पुढें जाऊं लागतो, तसतसा केसकालचा घाट जवळ येऊं लागतो आणि निसर्गसृष्टीचें स्वरूप निराळेंच सौन्दर्य धारण करूं लागतें.

केसकालचा घाट रायपूरपासून केवळ ऐंशी मैल अंतरावर आहे. पण इतक्या थोड्या अंतरांत सारें जग पालटल्यासारखें वाटावें, असें वाटण्याजोगें सृष्टिसौन्दर्य तेथें विराजत आहे. केसकालच्या डोंगराच्या सर्वोच्च शिखरावर एक छोटासाच पण सुंदर डाकबंगला आहे. घाटांतील वळणें मागें टाकीत आमची मोटार ह्या सुंदरशा डाक बंगल्यासमोर येऊन उभी झाली. डाकबंगल्यांत दुपारचें जेवण घेतलें. डाकबंगल्याच्या व्हरांड्यांत येऊन उभें राहावें व चहोंभोंवतालच्या सुदूर क्षितिजापर्यंत हिरवेगार उत्तुंग पर्वत पसरले आहेत. क्षितिजापर्यंत कुटेंहि पहा पर्वताच्या प्रचंड रांगाच रांगा! येथूनच बस्तरची सरहद्द सुरू होते. निसर्गसुन्दर देशाची सुरुवातहि निसर्गानें सुंदरच केली आहे.

बस्तर हें मध्यप्रदेशांतील सर्वांत मोठें संस्थान होतें. त्याचा विस्तार १३७२५ चौरस मैलाचा होता. बस्तरच्या उत्तरेस कांकेर आणि दुग जिल्ह्याची कांहीं सरहद्द आहे. पश्चिमेस चांदा जिल्ह्यांतील अहेरीची सरहद्द असून, पूर्वेस ओरीसा व हैद्राबादची सरहद्द आहे. एवढ्या मोठ्या प्रदेशांतील लोकसंख्या मात्र केवळ सात लक्षाची आहे. मुंबईची लोकसंख्या लक्षांत घेतां ह्या संपूर्ण प्रदेशाची लोकसंख्या, त्यामानानें पावपटहि नाहीं! नागपूर शहराच्या आजच्या लोकसंख्येइतकी लोकसंख्या, १३७२५ चौरस मैलांच्या बस्तर जिल्ह्यांत आहे! बस्तर हें सहा तहसिलींत विभागलें गेलें असून, तेथें सर्वदूर 'मुरिया' ह्या नांवानें संबोधल्या जाणाऱ्या आदिवासींची वसुती आहे. स्वातंत्र्यपूर्व काळांत संपूर्ण बस्तर संस्थानावर जगदलपूर येथील राजाचें आधिपत्य होतें. आतां परिस्थिति पालटली आहे. हें आतां संस्थान राहिलें नाहीं. बस्तरचें राजघराणें तेवढें तेथें आहे. राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें राज्य सरकारच्या हातीं झालीं आहेत.

आम्हीं जगदलपूरला येऊन पोंचलों त्यावेळीं रात्र झाली होती. त्या चांदण्या रात्रींत, बस्तरची ती राजधानी अतिमोहक वाटली. संपूर्ण बस्तरमध्यें हेंच एक आधुनिक मोठें शहर आहे. तेथें विद्युत्-दीपांचा लखलखाट असलेला पाहून, आपण जंगली मुलखांत असल्याचा क्षणभर विसर पडला. शहरांतील इमारती आधुनिक थाटाच्या आहेत. रस्तेबांधणीची पद्धत डोळ्यांत भरण्यासारखी आहे.

– दुसऱ्या दिवशीं दसरा होता. जगदलपूरचा दसरा महशूर आहे आसपासच्या गांवांतून शेंकडों आदिवासींची रीघ जगदलपूरकडे लागली होती. शहरांत उत्सवाची तयारी जोरांत सुरू होती. जंगली पक्षांच्या किलबिलाटानें सकाळीं ज्यावेळीं झोंप उडाली, त्यावेळीं झुंजुमुंजू झालें होतें. जंगली जमातीचे कांहीं प्रमुख आमची वाट पहात बाहेर बसले होते. त्यांच्या कानांत सोन्याच्या बाळ्या आणि गळ्यांतहि सोन्याच्याच माळा होत्या. डोक्याला मात्र लाल रंगाचा फेटा प्रत्येकानें गुंडाळला होता. बस्तरमधील आदिवासींचा जो प्रमुख असतो, त्याला 'मुखिया' अशा नांवानें संबोधतात आणि लाल







अनुक्रमणिका

रंगाचें पागोटें घालण्याचा अधिकार केवळ त्यालाच असतो. प्रत्येक मुखियाची सत्ता, पन्नास ते साठ खेड्यांवर असते आणि त्याच्या शब्दास लोक कमालीचा मान देतात. बस्तरच्या राजदरबारांतील हे मुखिये म्हणजे सरदार होत मुखिया इतकाच मान असलेली दुसरी व्यक्ति म्हणजे धर्मगुरू ही होय. मुखिया आणि धर्मगुरू यांची सत्ता त्या त्या विभागांत जारी असते आणि त्यांच्या सूचनेनुसार तेथील कारभार चालतो. मुखियांपैकीं बहुतेकांचा संबंध जगदलपूरच्या राजधानीशीं असल्यामुळें, त्यांना थोडेफार हिंदी समजते आणि बोलतांहि येते. अंतर्गत प्रदेशांत असलेल्या कित्येक आदिवासींनीं अद्याप जगदलपूर शहरसुद्धां पाहिलेलें नाहीं— मग आगगाडी आणि मोटारी पाहण्याची संधि त्यांना कोठून आणि कशी मिळणार? बस्तरमधील आदिवासींच्या जीवनाचा एक लघुपट तयार करण्यासाठी, ह्याच वेळीं कांहीं लोक आले होते व मी उतरलों होतों तेथेंच त्यांचा मुक्काम होता. ह्या मुखियांसोबत कांहीं आदिवासी स्त्री-पुरुषहि नटूनथटून आले होते. त्यांच्या नृत्याचें दृश्य त्या दिवशीं चित्रित करावयाचें होतें.

बस्तरमधील 'मुरिया' आदिवासी शाक्तपंथीय म्हणजे देवीचे उपासक आहेत आणि दंतेश्वरी ही त्यांची प्रमुख देवता. दंतेश्वरीचे ते जसे उपासक आहेत, तशीच भूतपिशाचांवरहि त्यांची कमालीची श्रद्धा आहे. अर्थात् पिशाचासंबंधींची त्यांची श्रद्धा भीतीवर आधारलेली आहे आणि त्या कारणानें, पिशाचशांति करण्यासाठीं त्यांचें कांहीं धार्मिक व्यवहारहि ठरलेले आहेत. बलिदानाची प्रथा तेथें सर्रास जारी असण्याचें हेंच कारण असावें. बस्तरचा बराचसा प्रदेश अद्याप असा आहे कीं, जेथें 'सुधारलेल्या' माणसाचा प्रवेश झालेला नाहीं. अशा प्रदेशांत नग्न आदिवासींची वसती असल्याचेंहि चौकशीअंतीं समजलें. ह्या अशा अंतर्गत आदिवासींची जात अत्यंत रानटी आहे व तेथें मानवी बलिदानाचें प्रकार आजहि चोरून मारून होतात, असें सांगण्यांत येतें. सर्वसाधारण आदिवासींचें व विशेषतः 'मुरिया' आदिवासींचें प्रमुख दैवत मात्र दंतेश्वरीमाई आहे. जगदलपूरपासून अंतर्गत जंगलांत ५३ मैलांवर असलेल्या दांतेवाडा नामक गांवी ह्या देवतेचें प्रमुख देवस्थान आहे. दांतेवाडा येथून देवतेची मूर्ति जगदलपूर येथें दरवर्षी दसऱ्याला रथांतून आणली जाते. दांतेवाडा ते जगदलपूरपर्यंतचा हा प्रवास लोक पायीच करतात आणि त्यासाठीं त्यांना तब्बल चार दिवसांचा वेळ लागतो.

दंतेश्वरीचें त्या दिवशीं राजधानींत आगमन झालें होतें. सुमारें दीड लक्ष आदिवासींचा प्रचंड तांडा सोबत आला होता. त्यांत पुरुष होते आणि स्त्रियाहि होत्या. बस्तरच्या राजाचें सिंहासन हें दंतेश्वरीमाईच्या मालकीचें आहे, अशी आदिवासींची भावना आहे. जगदलपूरच्या राजाला आजहि हे लोक ईश्वराचा अवतार समजतात. आपल्या राजासंबंधीं त्यांना कमालीचें प्रेम व आदर वाटण्याचें हेंच कारण असावें. त्यांच्या राजनिष्ठेसंबंधीं एक गोष्ट मला ऐकावयास मिळाली. सध्यांच्या राजाच्या वडिलांना कांहीं वर्षांपूर्वी, इंग्रजांच्या आमदानींत, तेथील सिंहासनावरून पदच्युत केलें होतें व त्यांना जगदलपूरबाहेर नेऊन ठेवण्यांत आलें होते. आपल्या राजाला दुसरे लोक घेऊन गेले आहेत, ही गोष्ट हां हां म्हणतां बस्तरभर पसरली. शेंकडो आदिवासी आपले तीर-कमठे घेऊन घराबाहेर पडले. ते राजधानींत येऊन दाखल झाले. सर्वांकडून एकच मागणी केली जात होती—"आमचा राजा परत द्या!" रानांतल्या ह्या मानवी वाघाला चिडविण्यांत अर्थ नाहीं असा प्रत्यय येण्यास वेळ लागला नाहीं. नंतर राजाला राजधानींत परत आणावें लागलें आणि सारें कांहीं शांत झालें. मी गेलो त्या वेळींहि असाच प्रकार तेथें घडला. पण कोणतीहि अनिष्ट गोष्ट झाली नाहीं. तो प्रकार असा कीं, दसऱ्याच्या दिवशीं दंतेश्वरीमाईला घेऊन येणारे लोक आपल्या राजाच्या दर्शनासाठीं दूरदूरवरून येत असतात. दंतेश्वरीचा रथ गांवांत आला कीं, राजा तिचें स्वागत करतो. पण त्या दिवशीं राजानें तिचें स्वागत केलें नाहीं. संस्थानाचें विलीनीकरण झाल्यानंतर तेथील राजेसाहेब जगदलपूर सोडून निघून गेले होते. दसऱ्याच्या दिवशीं ते विजगापट्टम येथें होते असें समजलें. दसऱ्याच्या दिवशीं त्यांचा राजा राजधानींत नसावा, अशी ही त्यां लोकांची पहिलीच वेळ होती. राजा नाहीं हें कळतांच हजारों आदिवासी कमालीचे दुःखी झाले. राजवाड्यासमोर दंतेश्वरीमाईची आरती चालू असतांना, राजासाठीं अश्रु ढाळणारे शेंकडों आदिवासी स्त्री-पुरुष माझ्या दृष्टींतून लपूं शकले नाहीं!

इतक्यावरहि दंतेश्वरीचें आगमन आणि त्यानंतरचा दसऱ्याचा समारंभ नेहमीप्रमाणें शांततेनें पार पडला. राजगुरूनें देवीची पूजा केली. बदललेल्या राजकीय परिस्थितीची झांक ह्या वेळीं जगदलपूर शहरावर प्रथम उमटलेली दिसली.

ह्या प्रदेशांतले लोक मागासलेले आहेत, हें खरें आहे. पण त्यांचीं नृत्यें पहात असतांना, मला तरी पाश्चात्य पद्धतीच्या 'बॉलरूम' किंवा 'कॅबरे' नृत्यांची आठवण झाल्याशिवाय राहिली नाहीं. हे लोक अर्धनग्न आणि अशिक्षित आहेत आणि 'सुधारलेले' पाश्चात्य लोक सुशिक्षित आणि शानदार कपडे घालणारे आहेत, एवढाच काय तो फरक! ह्या आदिवासींचीं नृत्यें, पाश्चात्य नृत्याशीं बव्हंशी जुळतात. पाश्चात्य नृत्यांचा मला अनुभव आहे; आणि तीं मी विपुल प्रमाणांत पाहिलीं आहेत. बस्तरमधील नृत्यें पाहून मी आश्चर्यचकित होऊन गेलो. पाश्चात्य नृत्यांतील 'फॉक्सट्राऊट' किंवा 'वॉल्टझ्' सारखीं नृत्यें पाहून, त्यांनीं तीं नृत्यें ह्या आदिवासी लोकांपासून तर चोरून घेतलीं नाहींत ना, असें क्षणभर वाटलें! आदिवासींच्या नृत्यांतहि वैचित्र्य आणि तालबद्धता असते. नृत्य करतांना ते पायांत घुंगुर बांधीत नाहींत. त्यांच्यांतील पुरुष वाद्यें वाजवितात त्या काठीलाच छोटीं घुंगुरें लावलेली असतात, त्यांचा

तालबद्ध स्वर अत्यंत मंजुळ वाटतो. वाद्य वाजविणारे पुरुष तालबद्ध स्वरूपांत पायांची हालचाल करतात व त्या अनुरोधानेंच स्त्रियांच्या पायांच्या हालचाली होत असते.

आदिवासींच्या नृत्यप्रसंगांच्या मुळाशी असलेली सामाजिक भूमिका, पाश्चात्यांच्या सामाजिक भूमिकेशीं तंतोतंत जुळणारी आहे.

आदिवासींच्या नृत्यप्रसंगांच्या मुळाशीं असलेली सामाजिक भूमिका, पाश्चात्यांच्या सामाजिक भूमिकेशीहि जुळणारी आहे. सामाजिक एकोपा वाढावा आणि स्त्रीपुरुषांतील मानसिक भेद विरून जाऊन त्यांच्यांत सुहृदता आणि मैत्री निर्माण व्हावी हाच हेतु पाश्चात्य नृत्यांचा असतो आणि तोच ह्या आदिवासी नृत्यप्रसंगांचाहि आहे. एकाला सुधारलेला म्हणावयाचें आणि दुसऱ्याला रानटी म्हणावयाचें इतकेंच !

नृत्यासंबंधीची गोष्ट निघाली म्हणून त्या दिवशीं घडलेल्या एका घटनेचा उल्लेख करण्याचा मोह आज मला अनावर झाला आहे. आदिवासींच्या नृत्याचा लघुपट घेण्याचें निश्चित झालें होतें. मलाहि बोलावलें होतें. जगदलपूरपासून कांहीं अंतरावर असलेल्या जंगलांत ह्या नृत्यप्रसंगांचें आयोजन केलें होतें. 'मुखिया' लोकांनीच ती खास व्यवस्था केली होती. कॅमेरा व रेकॉर्डिंग मशीन आमच्या सोबत होते. जगापासून सतत दूर ठेवण्यांत आल्यामुळें ह्या आदिवासींच्या मनांत भीतीच्या भावनेनें कसें मूळ धरलें आहे, ह्याची त्यावेळीं चुणुक दिसली. एक नृत्य आटोपल्यानंतर दुसरें नृत्य चालू झालें. नृत्याच्या वेळीं सर्व मुली गाणें म्हणत होत्या व त्या गाण्याचें रेकॉर्डिंग श्री. सोमेश्वर दयाल करीत होते. श्री. दयाल हे आतां एअर इंडिया कार्पोरेशनमध्यें एक बडे अधिकारी आहेत. गाणें आटोपल्या, नंतर पांच मिनिटांचे आंत, ध्वनिमुद्रित (रेकॉर्ड) झालेलें तें गाणें, श्री. दयाल यांनीं त्या लोकांना मशीनवर वाजवून दाखविलें. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, तें गाणें जसेच्या तसें ऐकूं येतांच, त्या मुलींना गंमत वाटली खरी; पण त्यापैकीं बऱ्याचजणीं कमालीच्या घाबरून गेलेल्या दिसल्या ! त्यांच्या सोबतच्या कांहीं माणसांनीं, ही गोष्ट म्हणजे भुताटकीचा प्रकार आहे, अशी त्या मुलींची समजूत करून दिली. ते आपसांत काय बोलतात तें आम्हांला समजलें नाहीं. परंतु मुखियाजवळ चौकशी करतां, तें रेकॉर्डिंग मशीन म्हणजे पिशाच्च असून, श्री. दयाल हे पिशाच्च साधना करणारे मांत्रिक आहेत अशी त्या लोकांची समजून होऊन ते घाबरून गेल्याचें समजलें. त्यामुळें ती सर्वच मंडळी तेथून पळून जाण्याच्या बेतांत होतीं. परंतु मुखियानें वेळींच सावधगिरी राखून, सर्व परिस्थिति त्यांना समजाऊन दिली तेव्हां कुठें गाडें ताळ्यावर आलें ! ही गोष्ट शहराजवळ असलेल्या विभागांत घडली—पण अगदीं अंतर्गत विभागांत तर असे लोक आजहि आहेत कीं, एकादा सुधारलेला इसम त्यांच्या दृष्टीस पडतांच, गांवांत पिशाच्च शिरलें आहे, असें वाटून ते जंगलांत पळून जातात आणि आपले तीर-कमठे सरसावून बसतात.

त्या दिवशीं सकाळीं आम्हांला आदिवासी लोकांचीं कांहीं गाणींहि, ऐकावयास मिळालीं. त्यांच्या पद्यरचनेंत वनराजींतील सौन्दर्याचा सुवास आहे आणि रानांतील स्वैर प्रीतीचा उन्मादहि आहे. बस्तरच्या पठारावर ऐकूं येणारें हें संगीत आणि त्यांतील अर्थ भुरळ पाडणारा आहे.

## कलाकृतींच्या जन्मकथा : १



# ओल्ड बॅटरसी ब्रिज

मूळनक्षत्रावर जन्मलेली कलाकृति !

कलाकृतीची जन्मकुंडली मांडण्याची रीत अजून ज्योतिषशास्त्रांत प्रचलीत नाहीं पण अशी रीत जर सुरू केली तर कैक कलाकृतींचे ग्रहयोग मोठे विलक्षण असल्याचें आढळून येईल. कैक कलाकृती अशा असतात कीं ज्यांच्या जन्मामुळे जन्मदात्या कलावंतांची भाग्यरेषा पूर्णपणें बदलून जाते. कांहीं कलाकृतीच्या जन्मानें कलावंताची भरभराट झाल्याची उदाहरणें जशी आहेत तशीच कांहीं कलाकृतींमुळें कलावंताचा भाग्यकाल संपुष्टांत आल्याची आश्चर्यकारक उदाहरणें घडली आहेत. असल्या दुर्भागी कलाकृतींत व्हिसलरच्या 'ओल्ड बॅटरसी ब्रिज' या कलाकृतीची गणना करावी लागेल. कोणच्या अशुभ मुहुर्तावर हे चित्र त्यानें काढायला घेतलें कोण जाणें ! या चित्रामुळें व्हिसलरची सारी संपत्ती नष्ट झाली; त्याला घरदार विकावें लागलें; एवढेंच नव्हे तर तो दिवाळखोर बनला !

युरोपच्या चित्रकलासृष्टींत व्हिसलरचें स्थान फार मोठें आहे. त्याच्या अलौकिक प्रतिभेने युरोपच्या कला परंपरेंत कांहीं नवे प्रवाह सुरू झालें. पौर्वात्येकडील चित्रांचें त्याला विलक्षण आकर्षण होतें. जपानी चित्रकार हुकसाई यानें काढलेल्या 'फुजुमाजवळील पूल' या चित्रानें त्याच्या मनावर विशेष परिणाम घडवला. एखादा देखावा चितारतांना त्यांतील बारकाव्यांना महत्त्व न देतां केवळ थोड्या रंगरेषेच्या सहाय्यानें त्यांतलें वातावरण चित्रांत उमटवलें

पाहिजे या विचारानें व्हिसलर भारावला. 'ओल्ड बॅटरसी ब्रीज या चित्रांत त्यानें हीच वातावरण निर्मिती करण्याचा प्रयत्न केला आहे. संध्याकाळच्या गडद छायेमुळें दृष्टिपुढें पुलाची केवळ काळी घनाकृती उभी आहे. दूरवरच्या किनाऱ्यावरील इमारती आकाशाच्या नीलवर्णांत बुडूं पहात आहेत. मधून मधून चमचमणारे दूरचे दिवे वातावरणांतल्या अद्भूततेंत काव्य निर्माण करीत आहेत. व्हिसलरनें रंगविलेलें हे चित्र फारच अप्रतीम आहे. केवळ वातावरण निर्मिती केवढी प्रभावी असूं शकते याचे हे चित्र म्हणजे एक उत्तम उदाहरण आहे.

पण या प्रतिभासंपन्न कलाकृतीनेंच व्हिसलरचें आयुष्य गोत्यांत आणलें! व्हिसलरनें या कलाकृतीची किंमत दोनशें गिनीज् ठेवली. ही कलाकृती जेव्हां प्रदर्शनांत मांडण्यांत आली तेव्हां रस्कीनसारखा सुप्रसिद्ध कलासमिक्षक त्यावर तुटून पडला. 'फोर्स क्लॅव्हिगेरा'च्या २ जुलै १८७७ च्या अंकांत या चित्रासंबंधीं रस्कीननें लिहिलें कीं, "गिऱ्हाइकांची शुद्ध फसवणूक करण्याच्या हेतूनें काढलेल्या अशा तऱ्हेच्या चित्रांला प्रदर्शनांत स्थान मिळणें अगदीं अयोग्य आहे. लंडनमधल्या मवालेगिरीच्या अनेक गोष्टी मी आजपर्यंत ऐकल्या आहेत, परंतु गिऱ्हाइकाच्या तोंडावर रंगाचें भांडें ओतून त्याचे २०० गिनीज् मागणारा व्हिसलरसारखा मनुष्य आजपर्यंत माझ्या पहाण्यांत आला नव्हता."

रस्कीनसारख्या माणसानीं केलेल्या या टिकेमुळें व्हिसलरच्या गिऱ्हाइकांवर विलक्षण परिणाम झाला. त्याचीं चित्रें कोणी विकत घेई ना. या आघातामुळें व्हिसलरनें अखेर रस्कीनवर अब्रुनुकसानीची फिर्याद दाखल केली. २५ नोव्हेंबर १८७८ ला जस्टिस हुडलेस्टोन आणि खास ज्युरीपुढें ही केस सुरू झाली.

प्रतिपक्षाच्या वकिलानें प्रश्न टाकला, "हें चित्र तयार करायला तुम्हाला केवळ दोन दिवसच लागल्याचें तुम्ही कबूल करता. दोन दिवसाच्या श्रमासाठीं तुम्ही २०० गिनिज्‌ची मागणी करतां हें योग्य आहे कां?"

व्हिसलरनें उत्तर दिलें, "दोनशें गिनीज् माझ्या दोन दिवसांच्या मजुरीची किंमत नसून त्या चित्रामागें उभ्या असलेल्या माझ्या जन्मभराच्या कलातपश्चर्येची ती किंमत आहे."

ही केस चालू असतांना मोठमोठ्या टिकाकारांच्या लेखण्या पाजळल्या गेल्या. अलबर्ट मूर व रोसेटी या दोघांनींहि व्हिसलरला पाठिंबा दिला व त्यानें काढलेल्या चित्रांत 'स्वतंत्र बुद्धीचा प्रतिभाविलास आहे' अशी प्रशंसा केली. उलट फीर्थ व बुर्न जोन्स या दोघांनींहि या चित्रावर टिका केली. 'चित्रांत रंगसंगती व वातावरण निर्मिती चांगली साधली असली तरी चित्रांत बारकाने नसून तें अपुरे आहे.' असा त्यांचा दावा होता. लंडन टाईम्सचा कलासमिक्षक टॉमटेलर यानेही याच टीकेची री ओढली व बारकावे भरून पूर्ण केलेले चित्र कसे असते याचा नमुना म्हणून टिशीयननें काढलेलें एक चित्र टाईम्स मध्यें प्रसिद्ध केलें.

ही सारीच कलात्मक चर्चा कलेच्या बाबतीत अनभिज्ञ असलेल्या त्या न्यायमंडळाच्या डोक्यावरून गेली! किंबहुना व्हिसलरची बाजू खरी वाटत असूनही रस्कीनसारख्या मातब्बर टीकाकारावर शस्त्र उगारण्याची न्यायमंडळाची छाती झाली नाहीं. अखेरीस केवळ एक फार्दींग नुकसानभरपाई व्हिसलरला मिळावी असा न्यायदेवतेने निकाल दिला!–याचा अर्थ व्हिसलरनें ही केस लढवण्यासाठीं जो अमाप पैसा खर्च केला तो पाण्यांत गेला. तो पैसा परत मिळणार नव्हता. या बरोबरच व्हिसलरची जी नाचक्की झाली आणि जे शिंतोडे त्याच्यावर उडवण्यांत आले तें निराळेच. कलासृष्टींत त्याला कोणीही पुसेनासे झाले. १८७९ मध्ये व्हिसलरनें घर विकले! दिवाळे काढले! आणि त्याच्या जवळची सारी चीजवस्तू कर्जापाई त्याला विकावी लागली!

व्हिसलरच्या हयातींत ज्या चित्रानें त्याला दुर्भागी बनवलें तें चित्र आज मात्र जगांतल्या अत्युत्तम कलाकृतींपैकीं एक म्हणून समजलें जाते. या चित्राची २०० गिनीज ही किंमत रस्कीनला हास्यास्पद वाटली होती पण तेच चित्र अतिशय हौसेनें आतां २००० गिनीजला खरेदी करून लंडनच्या टाटा गॅलरींत ठेवण्यांत आलें आहे.

**— भय्यासाहेब ओंकार**

---

त्यांतील कैफ अनावर आहे. त्यांतील सहृदयता असीम आहे. त्यांतील मादकता अपार आहे.

पाश्चात्यांच्या 'डॉरमेंटरी'च्या पद्धतीवर आधारलेली 'धोतुल' नांवाची संस्था, ह्या आदिवासी लोकांत पूर्वपारपासून चालत आली आहे; आणि त्यांच्या संपूर्ण समाजव्यवस्थेचा जन्म व विकास ह्या संस्थेतूनच झाला आहे. अशा तऱ्हेच्या संस्था, ह्या ना त्या स्वरूपांत जगांत सर्वत्र पसरलेल्या आहेत; आणि म्हणून 'धोतुल' ही संस्था आश्चर्याचा विषय होण्याचें कारण नाहीं. आदिवासींचीं अविवाहित मुलें व मुली हींच 'धोतुल' मध्यें जातात व तेथेंच त्यांचे वाङ्‌निश्चय होऊन, त्याची परिणति नंतर विवाहांत होत असते. प्रत्येक गांवांत बाहेरच्या बाजूला एक 'धोतुल' असते व त्याची देखरेख गांवांतील वयांत आलेलीं मुलें करीत असतात. विवाहेच्छुक मुलें व मुलीं तेथें जाऊन पहाटपर्यंतचा वेळ घालवितात. तेथे मुलीं आपल्या प्रियकराची सेवा करतात. मुली मुलांच्या अंगाला मालिश करून त्यांचें केंस विंचरतात. सुंदर केशरचना हें ह्या आदिवासींचें वैशिष्टय होय. पाश्चात्यांच्या केशप्रसाधनांत जशी कला आहे, तशीच ती कला ह्याहि लोकांत आहे. माणूस किंवा बाई कितीहि वृद्ध झाली, तरी तिच्या किंवा त्याच्या डोक्यावरील केंस पांढरा झाला आहे, असें अपवाद म्हणूनच आढळेल. बस्तरमधील आदिवासींचें दुसरें वैशिष्टय हें कीं, त्यांची राहणी कमालीची स्वच्छ असते.

मुलीनें मुलाची सेवा करावयाची हें 'धोतुल' मधील प्रमुख वैशिष्टय ठरेल. ह्या पूर्वींचाहि एक समारंभ असतो. 'धोतुल' बाहेर दररोज सायंकाळीं मुलें व मुली प्रथम गोळा होतात. त्यांनी परस्परांना 'जोहारी' (नमस्कार–प्रणाम) केल्यानंतर, त्यांच्यापैकीं एक मुलगी प्रत्येक मुलाला चिमुटभर तंबाखू देते. विवाहेच्छु मुलीला 'मोटियारी' म्हणतात आणि मुलाला 'चेलिका' अशा नांवानें








संबोधतात. मुलाला दिलेली तंबाखू तेथील कोठारांतली असते. बाहेर उभे असतांना, ज्या मुलीला जो मुलगा पसंत असेल, त्याच्या बोटाला ती हळूंच चिमटा घेते व नंतर तीं दोघें आंत जातात. तेथें हीं मुलें व मुली रात्रभर नृत्यांत मग्न असतात. सकाळीं मुलें प्रथम जागीं होतात व नंतर ते आपल्या प्रियकरणीला जागें करतात. पहाट संपून सूर्योदय होण्यापूर्वींच सर्वांनी 'घोतुल' बाहेर पडलेंच पाहिजे, असा नियम आहे. ह्याशिवाय 'घोतुल' मध्यें असतांना, कोणाचा कोणाशीं संबंध होता, ह्यासंबंधीची वाच्यता त्यांनीं कुठेंहि करावयाची नसते. आणि ती तशी कोणी केल्यास, गांवचा धर्मगुरू त्याला जबरदस्त शिक्षा फर्मावतो. 'चेलिका' आणि 'मोटियारी' यांचा अशा रीतीनें प्रीतिसंबंध जुळल्यानंतर ते विवाहास तयार होतात व आपली इच्छा आई-बापाला सांगतात. आई-बापानें विवाहाला जर मान्यता दिली नाहीं तर ते दोघेंहि प्रेमी जंगलांत पळून जातात. शेवटीं धर्मगुरूला किंवा गांवच्या मुखियाला मध्यें पडून मुला-मुलींच्या आई-बापांत तडजोड घडवून आणावी लागते आणि नंतर त्यांचा शोध करून त्यांना घरीं आणावे लागते. नंतर विवाहाचा समारंभ पार पडतो. बस्तरच्या गोंडवनांतील प्रियंवदाचें जवानींतील जीवन हें अशा उन्मादानें रसरसलेलें असतें !

प्रत्येक मुरिया आदिवासी स्त्री विवाहोत्तर आपल्या नवऱ्याशी कमालीची एकरूप झालेली असते आणि त्यांचा संसार थाटानें चालतो. नवरा-बायकोंत फाटाफूट झाल्याची उदाहरणें क्वचितच घडतात. आणि तसा प्रसंग आलाच तर काडीमोडीचीहि तरतूद असते. एकाद्या माणसानें विवाहित स्त्रीशीं संबंध ठेवल्याचें उघडकीस आल्यास, त्या पुरुषाचा बळी, त्या बाईच्या नवऱ्याकडून हां हां म्हणतां घेतला जातो. अशा तऱ्हेचें कठोर शासन असल्यामुळें, माणसाचें किंवा स्त्रीचें पाऊल वांकडें पडण्यास फारशी संधीच मिळत नाहीं. अशा कडक उपाययोजनेमुळें आदिवासींची ही कुटुंबसंस्था शाबूत राहिली आहे. सुशिक्षित समाजांत 'व्यभिचार' आणि 'अश्लिलता' हे जे शब्द ऐकूं येतात; ते शब्द ह्या समाजांत अस्तित्वांतच नाहींत. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, ते लोक कमालीचे अश्लिल आणि पराकोटीस पोंचलेले व्यभिचारी आहेत ! अश्लिलता ही मुख्यतः जांचक बंधनांमुळें येते. तीं बंधनें ज्या समाजांत नाहींत, तेथें त्या शब्दांचा जन्महि होत नाहीं. तीच गोष्ट व्यभिचाराची. 'घोतुल' ह्या संस्थेनें व्यभिचाराला स्थानच ठेवलेलें नाहीं. विवाहपूर्वीचें मातृत्व हें त्या समाजांतहि त्याज्य मानलें असून, त्यासाठीं भयंकर शिक्षा ठेवलेल्या आहेत. विवाहोत्तर व्यभिचाराला तर बलिदानाचीच शिक्षा ठेवलेली असल्यामुळें आणि प्रसंगोपात काडीमोडहि शक्य असल्यामुळें, व्यभिचाराला तेथें जवळजवळ थारा नाहीं, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.



सेल्फ पोर्ट्रेट

ह्या विषयावर आणखी असेंच किती तरी सांगतां येण्यासारखें आहे. आदिवासींच्या रीति-रिवाजांचा प्रत्येक भाग, स्वतंत्र लेखाचा विषय होऊं शकतो. असो. बस्तरचा आमचा मुक्काम आटोपला होता. परत जाण्याच्या तयारीनें, जगदलपूरच्या आमच्या बंगल्याच्या फाटकासमोर आम्ही उभे होतो. मोटारींत सामान भरणें चालू होतें. तोंच ते चार 'मुखिये' आम्हांला निरोप देण्यासाठीं तेथें येऊन पोंचले. कांहीं अंतरावर मोटारीची गंमत पहात एक तरुण 'मोटियारी' उभी होती. सुदृढ अंगबांधा. टप्पोरे काळे हंसरे डोळे. हंसणारीच जिवणी. बस्तरच्या रानांत जगणाऱ्या त्या रानहरिणीकडे आमचे डोळे खिळून राहिले. मी मुखियाला म्हटलें, "तिला इकडे बोलाव आणि पाहूं दे जवळून ही मोटार."

"नाहीं येणार ती, साहेब ! मोठ्या लाजाळू असतात आमच्या जंगलांतल्या ह्या पोरी !" मुखिया उत्तरला.

"हरकत नाहीं–बोलाव तर खरें !" मी म्हणालो.

"मोटियारी, ओ मोटियारी !" मुखियानें हांक मारली.

तिनें आपल्या भाषेंत 'ओ' दिली आणि ती खुदकन् हंसली.

मुखियानें खुणेनें बोलावलें.

तिनें मान हलवून नकार दिला.

"मग ओढत आणीन." मुखिया हंसत म्हणाला.

"पळून जाईन." ती म्हणाली.

"कुठें जाशील पळून ?" त्यानें विचारलें.

"जंगलांत......" ती उत्तरली.

मी मनांत म्हटलें, "ही निरागस, सुडौल रानची राणी ! तिला उदंड आयुष्य लाभो ! निसर्गाच्या सौन्दर्यांत जगणारें हें मानवी सौन्दर्य कायम टिको !"

मोटार चालू झाली. मोटियारी जागची हलली नाहीं. आम्हीं मुखियांचा निरोप घेतला. मी डोकावून पाहिलें. ती तशीच उभी होती. टप्पोरे डोळे हंसत होते आणि ओंठावरहि हंसूं होतें. जणूं काय ती म्हणत होती–'–'परदेशी आला आणि गेला !"

आणि बस्तरचें सौन्दर्य मागें टाकून आम्हीं शहराकडे भरधांव धांवत सुटलों !......

* * *









अनुक्रमणिका




*हीं एक तेलगू लोककथा. गेल्या अंकांत 'मदनरेखा' या नांवानें तीं सुरू झालीं. तिचा हा पुढचा भाग*

# वि★चि★त्र★'प★ण'

'**मा**झ्या मनांतलं चित्र मी पुरं करणारच!' म्हणून चंडीनें झेंप घेतली खरी; परंतु आधींच सावध असलेल्या राजकन्येनें चतुराईनें बाजूला होऊन त्याचा स्पर्श चुकवला, चंडीचा तोल गेला आणि पाटाच्या कडेला असलेल्या दगडावर डोकं आपटल्यानें त्याला मूर्च्छा आली. चंडीची ती स्थिति पाहून राजकन्या घाबरली. काय करावें हें तिला सुचेना. आजुबाजूला तिला एखादी सखीहि दिसेना. मघाचा तो हरीण-शावकहि केव्हांच गायब झाला होता. "अरे देवा आतां मीं काय करूं!" असें स्वतःशींच उद्गारून तिनें चंडीलाच एक दोन हाका मारल्या.

"चंडीं, ओ चंडी!"

तिनें त्याच्याकडे जवळून निरखून पाहिलें; त्याचा श्वासोश्वास बंद झालेला होता. तो अगदीं मृतवत् पडला होता. पाटाचं पाणी पसा भरभरून तिनें तें त्याच्या तोंडावर मारलें; पण त्या पाण्याच्या हबकाऱ्यांचा थोडा देखील चंडीवर परिणाम झाला नाहीं. याला अदाच खेडून जावं तसी पंचाईत न जावं तरी पंचाईत, 'इकडे आड आणि तिकडे विहीर' अशी राजकन्येची अवस्था झाली. खालीं वांकून तिनें त्याला हालवून पाहिलें; पण छे! कुडींतले पंचप्राणच निघून जावेत तसें त्याचें शरीर कलेवरवत झालें होतें. हें सर्व केवळ आपल्यामुळें झालें, याचें राजकन्येला अपार दुःख झालें; परंतु नुसतेंच दुःख मानल्यानें डोळ्यांसमोर घडलेला प्रसंग निभावत होता थोडाच. हें ब्रह्महत्तेचें पातक शिरावर घेऊन ती मुकाट्यानें घरीं थोडीच जाऊं शकत होती! एका नव्या विचाराची वाट तिचें मन चालूं लागलें. नुकताच घडलेला प्रसंग झरझर तिच्या डोळ्यां-समोरून सरकूं लागला.

देवदूतासारखी कांती असलेल्या त्याच्या पुष्ट शरीरानें तिला घट्ट जवळ घेतलें होतें. जोरदार मनगटानें तिचा कोमल हात करकचून धरला होता. "तूं मला हवी आहेस! माझं तुझ्यावर अपरंपार प्रेम आहे! माझ्या मनांतलं चित्र मी पुरं करणार!" असंच तो म्हणाला होता. तिला हें सारें नवीन होतें. तें बोलणें नवें होतें, तो स्पर्श नवा होता, तें त्याचें मागणें विचित्र असलें, तरी नवीन होतें. तें सारें आठवून तिचें अंग थोडेसें पुलकितहि झालें. ती मनाशी म्हणाली, 'गुरुबंधु असला म्हणून काय झालें? देवयानीनें कचावर नाहीं. का





अनुक्रमणिका

प्रेम केलं ? आणि शुक्राचार्यांची नव्हती का तिला अनुमती ? चंडी ब्राह्मणपुत्र, मी राजकन्या; पण राजकन्यांनीं देखील गरीब कुळांतल्यां ब्राह्मणांना नाहीं का वरलं ? अहिल्या आणि गौतम, च्यवन आणि सुकन्या, सत्यवान–सावित्री, दक्षकन्यासती आणि शिव अशी कित्येक उदाहरणें नाहींत का ? मग चंडीला तरी मी कां दोष द्याधा ? '

विचार करतां करतां ती खालीं बसली. त्याचें मस्तक उचलून तिनें आपल्या मांडीवर ठेवलें. तिचे डोळे भरून आले. आणि आँसवाच्या धारा झरूं लागल्या. मनांतल्या मनांत ती परमेश्वराचा धांवा करूं लागली. " विश्वेश्वरा माझ्या अपराधांना क्षमा कर ! आणि एकवेळ या माझ्या गुरुबंधुच्या कुडींत प्राण येऊं देत ! त्यासाठीं वाटेल तें करायला माझी तयारी आहे ! "

ती वांकली, त्याचें मस्तक हुंगून तिनें तें आपल्या हृदयाशीं धरलें. आणि हळूच त्याच्या कानांत ती म्हणाली.

" चंडी अरे किती अंत पाहाशील आतां ? उठ जागा हो ! अरे मीं तुझी परीक्षा पाहिली ! मघाशीं मीं जें बोललें तें सारं विसरून जा ! ते खरं नव्हतं ! मला तुझं मन पाहायचं होतं. तुझ्या निष्ठेची प्रचीति पाहायची होती मला. तुझं माझ्यावर असं अपार प्रेम असेल अशी माझी कल्पनाहि नव्हती. इतकी मी वाईट नाहीं रे ! जागा हो चंडी, जागा हो ! "

जणुं तिच्या त्या शब्दानीं अमृताचा वर्षाव झाला. सहज झोंपेंतून धडपडून उठावें, तसा तो उठून बसला. मदनरेखा आपल्याजवळ आहे, आपलें डोकें तिच्या मांडीवर होतें. अगदीं वांकून आपल्या कानांत ती कांहींतरी कुजबुजत होतीं हें पाहून तो आश्चर्यचकित झाला. तशाच स्थितींत झटकन् आपल्या बाहुपाशांत तिला घेत तो म्हणाला—

" रेखा, प्राणा तूं रागावलीस ? नको नको, तूं रागावूं नकोस. अग तूं माझी प्रीति आहेस ! मी असं करायला नको होतं; पण माझ्या मनावरचा माझा ताबा सुटला. मीं बहकलों, क्षमा कर मला ! पण माझ्या प्रेमाचा तूं स्वीकार केलास असं मी समजूं का ? चल आपण या लता वेलींना साक्ष ठेवून, दिशांना साक्ष ठेवून, देवाब्राह्मणांचा आशीर्वाद मागून, आकाशाच्या मांडवाखालीं एकमेकांचं पाणिग्रहण करूं. "

" चंडी, तुला मार्कंडेयाचं आयुष्य लाभो ! काय घाबरलें मी; पण चंडी राजघराण्याच्या रीतिप्रमाणें मला स्वयंवराचा अधिकार असला तरी असं हें नियमबाह्य वर्तन करून घराण्याला कलंक लागेल असं कांहींहि मी करूं इच्छित नाहीं. आणि माझ्यावर तुझं खरं प्रेम असेल तर तूंहि मला अशा संकटांत घालूं नयेस, अशी माझी तुला विनंति आहे ! मात्र तुला मीं एक वचन देतें. रीतिप्रमाणें माझं लग्न एखाद्या राजाशींच होईल हें निश्चित; परंतु माझ्या विवाहानंतरच्या पहिल्याच रात्रीं, माझ्या शरिराला माझ्या पतीचा स्पर्श व्हायच्या आधीं मीं तुझ्याकडे येईन. त्यावेळीं तुझ्या मनांतलें आतांचें चित्र तूं पुरं करूं शकतोस. अगदीं तुझ्या प्रेमाची शपथ ! आतां तरी मला जाऊं देशील ? "

( पान ४१ वर चालू )



[ असंबद्ध भाषणाच्या चढाओढीत भाग घेणाऱ्याच्या लक्षांत येतें कीं, तसें मुद्दाम बोलणें महा कर्मकठिण. त्याच प्रकारें अनंत काणेकर यांच्या ' निरर्थिका ' वरून स्फूर्ति घेऊन कोणी निरर्थक चुटके लिहिण्याचा प्रयत्न करूं लागला तर त्यांत नको असतांही अर्थ कसा घुसतो हे खालील ओळींवरून दिसून येईल. कदाचित् सार्थ कविता लिहिण्याच्या प्रयत्नांत परिपूर्ण निरर्थकता लाभेल काय ? ही अभ्यासकांनी विचार करण्यासारखी समस्या आहे. ]

— एकू

**अ** मदावादीं बहु आबादी !
जमिनीला चांदीची लादी
सोन्याची त्यावरती गादी
वादीला परि ना संवादी !

**आ** वास तिथें समुद्रकाठीं
' आ ' वासुनिया लोक पहाती
वावास कुणी शरणहि जाती
' हा वास नको द्यावी मुक्ती ! '

**इ** टारसीला खटारशी जर
आगगाडि वाटली तरीही
बनारसी ती येतांसरशी
टांग्याचीही होते सरशी !








**ई** दर कोठें ? कधिहीं मीं तर
नसें ऐकिलें भूमितलावर
'भीतर' अथवा 'बहार' कोठें
गुजरातेच्या आहे ईदर

**उ** नाव येथें 'चुनाव' झाला
बनाव ऐसा घडून आला
जनावरांचा जमाव जणु कीं
गुमान बैसे-सुभान अल्ला !

**ऊ** मदरमन हें गांव विलक्षण
सुदान देशीं, त्याचें लक्षण
कच्च्याही मांसाचें भक्षण !
देव करो तुमचें संरक्षण !

**ए** रंडोलग्रामी आतां
एरंडीचें झाडहि दुर्मिळ
एरंडेलाच्या घाण्याची
एरंडोलीं जरूर नाहीं

**ऐ** नापूरीं ऐन दुपारीं
चैन काय, तर पानसुपारी !
('लैन' मारण्या नसत्या मैना,
नैनांची तर होती दैना !)

**ओ** खावंदर द्वारकापुरी
ओखामंडळ तालुक्यांतरी
जोखा तेथें मीठ ढिगारे
चोखा अथवा कडवट बोरें !

**औ** ण्ढ्याचें नागनाथ-दर्शन
औट न घटकेचें आकर्षण
औदुम्बरचें दत्तहि दैवत
औतधरांसकळां सांभाळित

**अं** बरनाथ इथें सांपडलें
शंभर हातांवरती तेल
भंपक थाप जरी ही गमली
मंगतराम तुम्हा सांगेल !

**अः** मदनगरीं-अः-मदन जरी
नजरीं येणें संभव फार न,.
मदनज्वरपीडिता कुणी मग
परि दिसणें किति दुर्लभ त्याहुन !

• •

( पान २७ वरून चालू )

पुष्कळदां एकटें उभें रहावें लागतें. रचनाकार ( डिझायनर ) म्हणून मात्र मी एखाद्या श्रोतृवृंदासाठीं काम करतों, मी नटवेपणा करतो, मी लक्ष वेधण्यासाठीं हरप्रयत्न करतों. याचा अर्थ मला माझ्या सकाळच्या उद्योगाचा अभिमान आहे आणि दुपारच्या उद्योगाची शरम वाटते असा आहे कां ? ( लिओनी 'फॉर्च्यून'च्या कचेरींत फक्त दुपारीं जातो ! ) बिलकूल नव्हे. माझ्या कलेची जी एक सुसंगती आहे तिच्या मर्यादेंत काम करण्यांत मला मौज वाटते ! ”

असा हा प्राणी अमेरिकेला परत जातांना ज्या भारतीय चिजा मोठ्या कौतुकानें आपल्याबरोबर घेऊन गेला त्यांत राजस्थानी बाहुल्यांच्या जोडीला पुणेरी अडकित्ता आणि पेशवाईकालीन उदबत्तीघरसुद्धां होतें ! जाड चष्म्यामागून प्रांजलपणें हंसणाऱ्या या प्रतिभावंत पाश्चात्य रचनाकाराला त्यांतसुद्धां रचनेचे उन्मेष दिसले असल्यास नवल नाहीं !

• • •




( पान ३९ वरून चालू )

तिचें तें शब्द ऐकून चंडीच्या अंगावर सरकन् कांटा उभा राहिला. असें कांहीं विचित्र आणि असंभवनीय असें तिच्या तोंडून ऐकायला मिळेल याची त्याला तिळमात्र कल्पना नव्हती. आपल्या हातांतल्या तिच्या दोन्ही हातांवरची पकड अधिक घट्ट करीत, आणि जवळ ओढून तिच्या नजरेंत आपली नजर रोखीत तो म्हणाला—

"मदनरेखे, अशा धोकेबाज वचनाची मीं निदान तुझ्याकडून तरी अपेक्षा केली नव्हती. तूं जें बोललीस तें होणं कालत्रयीं शक्य आहे काय ? विवाहानंतरच्या पहिल्या मंगल रात्रीं—आयुष्यांतल्या असीम आनंदोत्सवाच्या प्रसंगीं–तूं तुझ्या पतीच्या–जो एक राजपुत्र असणार—त्याच्या कानावर ही गोष्ट घालणार. 'आजची रात्र मी दुसऱ्याशीं वचनबद्ध आहे, तेव्हां तुम्हीं मला जायची परवानगी द्या' असं तूं त्याला सांगणार, तो तुझं म्हणणं मान्य करून, तुला मोठ्या खुषीनें जाऊं देणार, आणि माझ्या जवळ येऊन तूं वचनपूर्ति करणार ! मदनरेखे, एखादा खुळादेखील तुझ्या या वचनावर विश्वास ठेवणार नाहीं. आपल्या पतीजवळ अशी मागणी करणाऱ्या स्त्रीचा शिरच्छेद किंवा त्याग न करणारा पुरुष हा "सर्वैमुक्तोथवा पशु" असाच असला पाहिजे. तूं जें बोललीस तें विचार करून बोलली असशील असं मला वाटत नाहीं. तूं बोलूं नये तें बोललीस, शिवाय माझ्या प्रेमदेवतेची शपथ घेऊन तिला आणखी अपमानीत केलीस !"

"तूं वेडा आहेस चंडी ! जें तुला अकल्पनीय आणि अशक्य वाटतं, तें मला सहजसाध्य वाटतं आहे. तुझ्या प्रेमदेवतेचा मीं अपमान करणें कधींहि शक्य नाहीं. माझ्या वचनावर विश्वास ठेव !"

"रेखा, स्त्रीच्या शब्दांवर कधींहि विश्वास ठेवूं नये असं शास्त्र-वचन आहे. स्त्रीनं दिलेलीं वचनं म्हणजे तीं आकाशांतून पडलेल्या गारांसारखीं. उष्णतेची झळ लागली कीं गारा वितळून जातात, तद्वतच स्त्रीचीं वचनं. राजकन्ये, लग्नानंतर मला तुझी प्राप्ति होणें कदापि शक्य नाहीं." एवढं बोलून तो छद्मीपणानें किंचित हंसला आणि तिला अधिक जवळ ओढीत म्हणाला—

"मदनरेखे, ज्याची कित्येक दिवस आराधना केली तें भाग्य अचानक हातीं आलें असतांना, तो अमृताचा प्याला ओठाशीं आला असतांना, त्याचा उपभोग न घेतां दूर सारण्याचा मूर्खपणा माझ्या हातून कधींहि होणें शक्य नाहीं. जुगारांत अचानक मिळालेल्या संपत्तीचा त्याचक्षणीं जो उत्तम विनियोग करतो तोच खरा विचारी नपेक्षां जशी लाट अचानक भाग्य घेऊन येते तशीच ती घेऊन जातेहि. आतां या क्षणीं मी तुला सोडून दिली तर या जन्मीं पुन्हां तुझी भेट होणें शक्य नाहीं अशी माझी खात्री आहे. तूं कितीहि आर्जवं विनंत्या केल्यास तरी आतांची ही संधि मी दवडणं शक्य नाहीं, होणारे परिणाम भोगण्याची माझी तयारी आहे."

"चंडी तूं ब्राह्मण पुत्र, आणि त्यांतून माझ्या गुरुचा पुत्र. तुला दिलेलें वचन मीं पूर्ण करीन हें मी सर्वस्वाची शपथ घेऊन सांगतें तुला आलेल्या शंका रास्त आहेत; परंतु "स्त्रियश्चरित्रम्। पुरुषस्य











भाग्यम् । देवो न जानाति । " या सुभाषितावर विश्वास ठेव. आणि प्रचीति पाहा. फार वेळ झाला आतां. मला जाऊं दे. कुणी पाप्यानें पाहिलं तर दुर्लौकीक होईल. आणि गुपीत उघड्यावर पडेल ! " असं म्हणून स्फुंदस्फुंदून ती रडूं लागली. एकाएकीं चंडीचं मन पालटलं. त्यानें तिचे हात सोडले आणि तो म्हणाला—

" जा राजकन्ये मदनरेखे, जा. तुझ्या स्त्रीचरित्राची महती मला पाहायची आहे, प्रचीति घ्यायची आहे, जा ! "

असं बोलून झपाट्याने फिरून चंडी निघून गेला. एकंदर घडलेल्या गोष्टीमुळें मदनरेखेला ताण असह्य झाला. कशीबशी स्वतःला सांवरत सांवरत महालाकडे ती परत आली. आंत जाऊन शय्येवर स्वतःला एकदम लोटून द्यावं असं तिला वाटलं; परंतु तिथपर्यंत जाणंहि तिला शक्य झालं नाहीं. शय्यागाराच्या दारांतच ती कोसळली आणि निचेष्ट होऊन पडली.

* * *

" राजकुमारी, राजकुमारी एक गोड गोड गुपीत सांगितलं तर मला बक्षीस द्याल ? "

तिची प्रिय सखी शिखरिणी लाजत लाजत म्हणाली.

" अग पण काय आहे तें तरी सांगशील ! "

" उद्यांपासून स्वयंवराची तयारी चालू होणार आहे. आणि येत्या शुद्ध सप्तमीच्या सुमुहूर्तावर, मनांत येईल त्या सुंदर सुंदर, सद्गुणी, पराक्रमी राजपुत्राच्या गळ्यांत माळ घालून आमची राजकुमारी राणी होणार ! " शिखरिणी एवढं सांगून बक्षिस घेऊन निघून गेली, आणि गेल्या आठ दिवसांच्या घटनांचा चित्रपट मदनरेखेच्या डोळ्यांसमोरून सरकूं लागला.

रत्नजडित मंचकावरील मऊ मऊ शय्येवर पडल्या पडल्याच तिनें डोळे उघडले, त्यावेळीं तिचा हात राजवैद्यांच्या हातांत होता. तिचे वडील एका मोठ्या संकटांतून मुक्त झाल्यासारखे सुस्कारा सोडून हास्यवदनानें तिच्याकडे पाहात होते. राणी रत्नमाला डोळे पुशीत आणि ईश्वराजवळ करुणा भाकीत खालीं वांकून तिला विचारत होत्या, " कसं वाटतं बाळ तुला आतां ? " या दासदासींची बरीच धांवपळ उडाली असली पाहिजे. राजगृहांत फार मोठा हलकल्लोळ उडाला असला पाहिजे. त्याशिवाय ही असली विचित्र स्तब्धता पसरणार नाहीं. म्हणजे मघाचा तो प्रसंग तर कुणी पाहिला नाहीं ना ? आणि कुणी पाहिला असल्यास, राजदूतांकरवीं चंडीला पकडून त्याला दंडास तर पात्र व्हावें लागले नाहीं ना ? आतांपर्यंत सगळीकडे दुर्लौकिक तर पसरला नाहीं ना ? अशा दारुण शंकांनीं तिचं मन ग्रासलं. ती मोठ्यानेंच ओरडली—

" काय चाललंय हें ? "

आणि मग जो खुलासा झाला त्यानें तिचा जीव भांड्यांत पडला. केवळ ती शय्यागाराच्या दरवाजांत कोसळली. इथपासूनच हकीगत पुढें सुरू होत होती. मागचा इतिहास सर्वांनाच अज्ञात होता. पुढचे आठ दिवस राजवैद्याच्या सल्ल्याप्रमाणें तिला शय्यागारांतच काढावे लागले होते. शक्यतों लवकर आतां विवाह ठरवलाच पाहिजे असाहि राजवैद्यांचा सल्ला होता. आणि स्वयंवर ठरवल्याची गोड बातमी शिखरिणीनें आतांच सांगितली होती.

ती उठली आणि तशीच आईकडे गेली—आणि म्हणाली.

" आई, स्वयंवराकरितां माझा 'पण' तुम्हीं काय जाहीर केलांत ? "

" योग्य वेळीं तुझे वडील तुला विचारतीलच. तुझा तो अधिकार आहे; परंतु तुझा 'पण' तरी काय आहे, तो मला सांगशील काय ?"

" हो ! ऐक ! तुला थोडासा तो विचित्र वाटेल. सर्वांनाच विचित्र वाटेल; परंतु तो 'पण' आहे. लग्नानंतरची पहिलीच रात्र जो माझं म्हणणं मान्य करील, माझा अधिकार मान्य करील, त्याच्या गळ्यांत मी माळ घालीन. आणि तेवढ्या त्या रात्रीनंतर त्याची मी जन्माची दासी होईन ! " ● ● ●











अनुक्रमणिका

*उत्खननांत सांपडलेल्या, साडेचार हजार वर्षांपूर्वीच्या, पाण्याखालीं गडप झालेल्या पृथ्वीच्या पोटांतील एका भारतीय शहराचा सामान्य माणसाला थक्क करून सोडणारा इतिहास...*

# मृतांची नगरी



उत्खननांत सांपडलेलें एक पुरलेलें जोडपें

अ. सी. केळुसकर

"आपण ज्या ठिकाणीं उभे आहोंत ती साडेचार हजार वर्षांपूर्वीची गोदी आहे."

श्री. एस. आर. राव म्हणाले.

आम्ही आश्चर्यानें त्यांच्याकडे पहातच राहिलों.

पण त्यांनीं आम्हांला क्षणभरदेखील मुग्धांत ठेवलें नाहीं. त्यांनीं लगेच खुलासा केला, "हराप्पा संस्कृतीचं हें केंद्र आहे. साडेचार हजार वर्षांपूर्वी या ठिकाणीं एक मोठी संस्कृति उदयास आली अन् महापुरांत वाहून गेली. हे तिचे अवशेष आहेत !"

हराप्पा आणि मोहेनजो दारो हीं दोन नांवें माझ्या परिचयाची होतीं. स्टुअर्ट पिगॉट यांच्या 'प्रिहिस्टॉरिक इंडिया' या पुस्तकांत या ठिकाणच्या प्राचीन संस्कृतीसंबंधी मी बरेंच वाचलें होतें. तेथे सांपडलेले भग्नावशेष मी मुंबईस 'प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम'मध्यें पाहिले होते. त्यांचा निर्देश करतांच श्री. राव म्हणाले, "इथं सांपडलेल्या वस्तूंचं आम्ही देखील एक 'फिल्ड म्युझियम्' बनविलं आहे. तें आपण नंतर पहावयास जाऊंच."

या म्युझियमचा उल्लेख प्रो. हुमायून कबीर यांनीं आपल्या भाषणांतून केला होता; हें मला ठाऊक होतें आणि मुंबईचे राज्यपाल श्रीप्रकाश यांनीं हें उत्खनन पहाण्यांत बराच काळ घालविला होता व बरीच जिज्ञासा व्यक्त केली होती, हें देखील मला ठाऊक होतें.

अहमदाबादेच्या आग्नेय दिशेस ५० मैलांवर असलेलें हें ठिकाण पहाण्यासाठीं आम्हीं पत्रकार व साहित्यिक आडवाटेनें आलों होतों. 'लोथळ' हें या ठिकाणाचें नांव. अहमदाबाद बोटाद रेल्वे लाईनवर तें आहे. त्या लाईनवरील भुरकी स्टेशनापासून तें अवघें चार मैलांवर आहे.

लोथळ याचा गुजरातीमध्यें अर्थ मृतांचें ठिकाण अथवा टेकडी असा होता. सरागुआला नांवाचें एक गांव आहे. त्या गांवाचा एक भाग ही मृतांची टेकडी होय !

या ठिकाणाला 'लोथळ' (लोथल हा उच्चार चुकीचा आहे.) असें नांव देण्यांत आलें याचें मला आश्चर्य वाटलें. 'मोहेनजो दारो' याचा अर्थ सिंधी भाषेंत मृतांची टेकडी असाच होतो. अशा ठिकाणांना अशीं अन्वर्थक नांवें देणाऱ्यांच्या कल्पकतेची खरोखरच तारीफ केली पाहिजे.

भारताची फाळणी झाली नसती तर कदाचित हें उत्खननाचें काम हातीं घेण्यांत आलें नसतें. फाळणीमुळें हडाप्पा–मोहेनजो दारो पाकिस्तानांत गेलीं. तेव्हां त्यांच्या संस्कृतीचे अवशेष भारतांत कोठे सांपडतात कीं काय ते पहाण्यासाठीं भारत सरकारच्या 'ऑर्किऑलॉजिकल् डिपार्टमेंट'नें उत्खनन करण्यास सुरवात केली. त्या खात्याचे सुपरिंटेंडेंट श्री. एस. आर. राव यांनीं कच्छच्या रणापासून सुरवात केली. आणि १९५४ सालच्या नोव्हेंबरमध्यें या ठिकाणाचा एकाएकी शोध लागला !

लोथळप्रमाणें हराप्पा संस्कृतीची साक्ष

देणारीं अशीं पन्नास ठिकाणें आज गुजरात व सौराष्ट्र यामध्यें आहेत !

स्टुअर्ट पिगॉट यांनीं 'प्रिहिस्टॉरिक इंडिया' या आपल्या पुस्तकांत सादर केलेल्या माहितीप्रमाणें हराप्पा या शहराचा १८५६ सालींच शोध लागला असता. त्या खालीं जॉन व विल्यम या ब्रण्टन बंधूनीं कराची ते लाहोर हा ईस्टर्न इंडिया रेल्वेचा लोहमार्ग बांधावयास घेतला. त्यावेळींच रेल्वेचे रूळ टाकण्याचें काम चालू असतांनाच या शहराचे भग्नावेशष सांपडले होते. ते तसेच दडपून टाकून त्यावरून ही रेल्वे नेण्यांत आली. पुढें १९२२ सालीं सर्वे डिपार्टमेंटचे श्री. आर. डी. मुजुमदार यांनीं हराप्पा-संस्कृतीचे भग्नावशेष सांपडले. आणि तेव्हांपासून हें काम विशेष जोमानें सुरू झालें. तो सारा इतिहास या ठिकाणीं मी देत नाहीं. तर लोथळ येथें आम्हीं काय पाहिलें व त्याचा हडाप्पाच्या संस्कृतीशीं कसा संबंध पोंचतो तेवढाच इतिहास मी सादर करणार आहे.

× × ×

सुरुवातीला ज्या गोदीचा मी उल्लेख केला ती विटांनीं बांधून काढलेली होती. तिची लांत्री ७१० फूट होती व रुंदी ११६ फूट होती. ती किती खोल असावी याचा अंदाज अद्याप लागला नव्हता, तथापि ज्या भिंती खणून काढण्यांत आल्या होत्या त्यांची उंची १४ फूट होती.

या गोदीमध्यें पूर्वेच्या बाजूनें जहाजें येत असत. तिच्या तोंडाशीं एक लहानशी विटांची भिंत होती. त्यामुळें ओहोटीच्या वेळीं तीमध्यें भरपूर पाणी रहात असे. दक्षिणे गोदीच्या धक्क्याच्या बाजूस जादा पाणी वाहून जाण्यासाठीं एक कालवा काढण्यांत आला होता. भरतीच्या वेळेस आलेलें पाणी अडविण्यासाठीं दरवाजे व लांकडाचे ओंढके बसविण्याची व्यवस्था होती. त्या ओंढक्यामुळें व दरवाजांच्या मदतीनें गोदींतील पाण्याची पातळी व्यवस्थित राखतां येत असे असें दिसतें. साडेचार हजार वर्षांपूर्वीच्या गोदींची ही पद्धति पाहून आम्हांला सहाजिकच आश्चर्य वाटलें.

आज समुद्र या ठिकाणापासून दोन अडीच मैल मागें हटला असला तरी चौदाव्या शतकांत भोलद बंदरांत मोठी जहाजें येत असत. हें ठिकाण लोथळपासून तीन मैलांवर आहे. आणि साठ वर्षांपूर्वी साबरमती व भोगाव या दोन नद्यांतून होड्या या लोथळच्या पायथ्यापर्यंत येत असत. आज लोथळपासून या दोन्ही नद्या दूर हटल्या असल्या म्हणजेच होरल्या असल्या तरी पावसाळ्यांत मात्र या लोथळ गांवाच्या आसपास पाण्याचें मोठें तळें सांचते !

साडेचार हजार वर्षांपूर्वीच्या या लोथळ शहराचें क्षेत्रफळ किती होतें ? पृथ्वीच्या पोटांतून खणून काढण्यांत आलेला जो भूप्रदेश आमच्या समोर पसरला होता त्याची लांबी सुमारें अर्धा मैल होती व रुंदी पाव मैलापेक्षां थोडी जास्त होती. आणि त्याच्या परिसरांतील पन्नास चौरस मैलांच्या प्रदेशांत पावसाळ्यांत पाणी सांचतें. तथापि जो अंदाज श्री. राव यांनीं व्यक्त केला त्यावरून मूळ लोथळ शहर सध्यांच्या आविष्कृत भागाच्या दुप्पट तरी मोठें असावें, असें म्हणावयास हरकत नाहीं.

लोथळची लोकवस्ती गोदीच्या परिसरांतच होती, हें उघडच दिसत होतें. गोदीच्या वरच्या भागांत उत्खननांत जे मातीचे निरनिराळे थर लागले त्यावरून या शहराला पुराच्या पाण्यापासून एकापेक्षां जास्त वेळां धक्का पोंचला असावा असें दिसतें. पुरांत शहराचा भाग वाहून गेल्यावर त्या लोकांनीं जास्त उंच बांध घालून नवीन शहर वसविलें. अमूक एका पातळीपर्यंत पाणी चढते असें आढळून आल्यावर त्यापेक्षां उंच जागीं अथवा उंच बंधारा बांधून घर बांधण्याची पद्धत आज देखील आढळते, असें श्री. राव यांनीं बडोदें येथील आपल्या निवासस्थानाचा उल्लेख करून आम्हांला सांगितलें.

शेवटीं हें लोथळ शहर कांहीं त्या महा पुरापासून वांचू शकलें नाहीं. तें पुराचें पाणी त्यावरून गेलें. पुरामुळें वाहून आलेल्या मातीचे थर त्यांवर सांचले आणि त्या मातीखालीं व त्या पाण्याखालीं तें शहर गडप झालें. तें आतां साडेचार हजार वर्षांनंतर पृथ्वीच्या पोटांतून खणून काढण्यांत आलें होतें. आणि आम्हीं त्या लोथळच्या रस्त्यांतून साडेचार हजार वर्षांपूर्वीच्या मृतांच्या नगरींतून चाललों होतों.

त्या मृतांच्या नगरींतील चार रस्ते खणून काढण्यांत आले होते. त्या रस्त्यानीं आम्ही चाललों होतों. शहराच्या मध्यभागीं वस्ती होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना घरें बांधण्यांत आलीं होतीं. हीं सर्व घरें एका रांगेंत होती. त्या घरांचीं जोतीं आम्हांला स्पष्ट दिसत होतीं.

एका रस्त्यांत तर आम्हांला न्हाणी घर असलेलीं बारा घरें म्हणजे त्यांचीं जोतें ओळीनें लागलीं. न्हाणी घरांतील सांडपाणी वाहून नेण्यासाठीं खास व्यवस्था—जशी उघड्या गटारांची असते तशी—होती. पाणी वाहून नेणाऱ्या चट्टया विटांनीं व्यवस्थित बांधून काढण्यांत आल्या होत्या. आपल्याकडे जशी गटारांच्या तोंडावर झांकणें असतात, तेथें गाळ सांचतो व तो मागाहून उपसून काढण्यांत येतो, तशा प्रकारची व्यवस्था या



अनुक्रमणिका








नगरींत होती. तेथें सांडपाण्याचा गाळ सांचविण्यासाठीं रांजण होतें त्या रांजणांत गाळ सांचून बाकीचें पाणी वाहून जाण्याकरितां नाला बांधण्यांत आला होता.

मी हें सर्व पहात असतांना मला मुंबई विरार रेल्वेवरील नाला सोपारा स्टेशनपासून अर्धा पाऊण मैलावर तीन वर्षांपूर्वी पाहिलेल्या एका उत्खननाची आठवण झाली. श्री. चितळे नांवाच्या आमच्या एका तरुण मित्रानें तेथें उत्खनन केलें होतें. दुर्गा भागवत, प्रा. झाला, एक रीसर्च स्कॉलर वसुमती पारीख व एक कॉलेज विद्यार्थी आर. जी. भोगटे असे आम्ही पांचजण तें उत्खनन पहाण्यास गेलों होतों. ही सांपडण्याची व्यवस्था पाहून असें वाटलें, कीं हराप्पा संस्कृतीचे पाईक अहमदाबाद, सुरत, भडोचवरून खाली वसईपर्यंत तर आले नसतील ? कारण आम्ही जें उत्खनन पाहिलें त्याच्याजवळच जमिनींत गडप झालेल्या एका बंदराचा भाग दिसत होता. आणि ५०–६० वर्षांपूर्वी वसईच्या खाडींतून होड्या तेथें येत असत, असें आम्हांला सांगण्यांत आलें. मात्र ही नगरी दोन अडीच हजार वर्षांपूर्वीची आहे. असो.

\+ + +

अशा या लोथळ नगरींत रहाणारे लोक तरी कसे होते ? ते शेतकरी होते, ते मच्छिमारीचा धंदा करीत असत व दूर देशांशीं त्यांचा व्यापार चालत असे, असें त्या नगरींत जे भग्नावशेष सांपडले त्यावरून वाटतें. लोथळ नगराच्या रचनेवरून तेथे नगराचा कारभार पाहाण्यासाठीं आपल्या शहरांसारखी एखादी नगरपालिका असावी असें वाटतें. निदान नागरी जीवनाचे संस्कार त्यांच्यावर झाले होते व त्यांच्या जीवनांत एकसूत्रीपणा होता असें दिसतें. अथवा एखादी धार्मिक अगर धर्मातीत अशी संघटना या नगराचा कारभार पहाण्यासाठीं असावी असें दिसतें.

आतां हे लोक कोणत्या धर्माचे होते तें सांगतां येणें कठीण आहे. तथापि त्यांच्या घरासमोर जीं यज्ञकुंडें व त्यांत जळलेलीं हाडें सांपडलीं त्यावरून यज्ञसंस्थेचें ते उपासक असावेत असें वाटतें. हराप्पा येथील लोक, रानटी जनावरांची एक देवता होती तिला मानीत असत असें पिगॉट यांनीं लिहिलें आहे. ही देवता म्हणजे पशुपति शंकर, असा एक अंदाज लावतां येतो. परंतु निश्चितपणें कांहीं सांगतां येत नाहीं.

तसें पाहिलें तर हे लोक मोठे अद्भुत होते, कारण आम्ही त्यांची जी दफनभूमि पाहिली त्यावरून नवराबायकोंचीं प्रेतें एकत्र पुरण्याची पद्धत होती, असें आढळून आलें. यावरून काय तर्क करावयाचा ? नवरा मेल्यानंतर बायको त्याच्याबरोबर सती जात असे का ? तशी पद्धत नसेल तर नवराबायको या दोघांना एकत्र पुरण्याच्या या पद्धतीचा अर्थ काय ? नवऱ्याच्या मागोमाग बायको मरण पावण्याचा चमत्कार नेहमीच कसा घडणें शक्य आहे ? आतांपर्यंत अशा तीन जोडप्यांचीं थडगीं सांपडलीं आहेत.

या प्रत्येक प्रेताच्या शेजारीं पाण्याचें भांडे, एक मातीची थाळी, धान्यानें भरलेला घडा वगैरे साहित्य आढळलें. भारतांतील आदिवासी मुलखांतून अशाच प्रकारची दफनपद्धति आढळते !

ती यज्ञसंस्था, ह्या यज्ञांतून पशूंना बळी देण्याची पद्धति आणि नवराबायकोला एकत्र पुरण्याची पद्धति यावरून या लोकांचा धर्म कोणता होता, हें सांगणें कठीण आहे, असें दफनभूमींत उत्खनन करीत असलेले अधिकारी श्री. गुप्ता आम्हाला म्हणाले. वेदामध्ये यासंबंधींचा उल्लेख आढळतो, असें



व्यापारी दळणवळणासाठीं वापरण्यांत येणारी चित्रलिपी मुद्रा.

श्री. राव यांनीं सांगितलें. तथापि आपलें निश्चित मत या लोकांचा धर्म व संस्कृति यासंबंधी बनलेलें नाहीं असें श्री. राव शेवटीं म्हणाले.

* * *

लोथळची बाजारपेठ आम्ही पाहिली. तेथील दुकानें आजच्या दुकानासारखीं व्यवस्थित होतीं, असें तेथें सांपडलेल्या भग्नावशेषावरून दिसलें. तेथें उत्खननांत सांपडलेले



अनुक्रमणिका







कांहीं पदार्थ आम्ही पाहिलें. त्यावरून या लोकांचा विविध जातींचे मणी बनविण्याचा मोठा धंदा असावा असें दिसतें. अनेक जातींचे लहान मोठे मणी आम्ही पाहिले. ते विविध रंगाचे मणी होते. त्यांत कांचेचे मणी होते. सोन्याचे मणी होते. निरनिराळ्या प्रकारचीं कर्णभूषणें होतीं. एक सोन्याचें सूर्यफूल तर इतकें पातळ होतें कीं, तें बनविणाऱ्या सुवर्णकाराच्या हस्ताच्या कौशल्याची तारीफ करावी तेवढी थोडी.

निरनिराळ्या मौल्यवान दगडांचे अलंकार बनविण्यात हे लोक हुशार होते. भगत्रव व मेघम या दोन बंदरांतून चेरी व अकीक या दगडांची आयात होत असे व त्या दगडांचे मणी हडप्पा येथील रहिवाशांसाठीं निर्यात केले जात असत. विशेषतः सिंधु नदीच्या खोऱ्यांतील प्रदेशांतून या मालाची निर्यात होत असे. हराप्पाच्या लोकांच्या वसाहती लोथळच्या आसमंतांतील प्रदेशांतून होत्या. किम व निर्मया या दोन नद्यांच्या तीरावर त्यांनीं वसाहती केल्या होत्या.

या ठिकाणीं कांहीं कांचेच्या व तांब्याच्या बांगड्या सांपडल्या आहेत. तांब्याचे मासे पकडण्याचा गळदेखील सांपडले आहेत. तसेंच ब्राँझ धातूंचे चाकू, सुऱ्या, परशु वगैरे हत्यारे सांपडलीं आहेत.

हे लोक गळ टाकून मासे पकडीत असत, तसे जाळीं टाकून मासे पकडीत असत. जाळीं पाण्यांत बुडावीं म्हणून टाकून ते आजच्याप्रमाणें शिशाच्या वजनाचा उपयोग करीत असत, व भाजलेल्या मातीची वजनें वापरीत असत.

या लोकांचा परदेशाशीं व्यापार चालत होता. मातीचीं भांडीं, चित्रें व अन्य वस्तू ज्या सांपडल्या त्यावरून मिसर मेसेपोटेमिया, युफ्राटिस, टायग्रीस वगैरे प्रदेशांशीं त्यांचा व्यापार चालत होता असें दिसतें.

मिसरमधील उत्खननांत जशा प्रकारचीं भांडीं सांपडलीं आहेत म्हणजे भाजलेल्या मातीचीं भांडीं, तशाच प्रकारचीं भांडी या ठिकाणीं सांपडलीं आहेत. हीं भांडीं आम्हीं पाहिलीं. या भांड्यांची आंतील बाजू काळी आहे, तर बाहेरील बाजू चॉकलेटी रंगाची परंतु किंचित् लालसर आहे. अशा प्रकारचीं भांडी हराप्पा व मोहेनजो दारो येथे सांपडलेली नाहींत. याचें कारण कांहीं कां असेना, कदाचित असें असेल हीं कांहीं समुद्रावरचीं बंदरें नाहींत. जसें लोथळ होतें.

कांहीं भांड्यांवर जीं चित्रें सांपडलीं तशी चित्रें युफ्राटिस व टायग्रीस दरीमधील उत्खननांत यापूर्वी सांपडलीं आहेत. खिस्तपूर्व तीन हजार वर्षापूर्वीचीं हीं भांडीं आहेत. यावरून या प्रदेशाशीं लोथळचें दळणवळण व व्यापार-उदीम होता, असा अंदाज निश्चितपणें बांधतां येतो.



आँ—मला शिंक येतेय असं वाटतं...

आम्ही कांहीं भाजलेल्या मातीच्या आकृत्या पाहिल्या. कांहीं आकृत्या अशा होत्या, कीं त्यांच्या वाट्या चौकोनी होत्या. अशा प्रकारच्या वाट्या असिरिअन लोक ठेवीत असत. आणि पांडवांची मयसभा बनविणारा मय हा असिरियन होता असा दाखला सांपडतो. पांडवांच्या काळांत असिरियन शिल्पाचा भारतीय शिल्पावर फार परिणाम झाला होता. असो.

दुसरी एक आकृति आम्ही अशी पाहिली कीं जी थेट इजिप्तच्या ममीसारखी वाटली. म्हणजे मनुष्य मेल्यानंतर मसाला भरून प्रेत ठेवण्याची जी पद्धत इजिप्तमध्यें फार प्राचीनकाळी होती तिची माहिती लोथळच्या लोकांना होती असें दिसतें. याचा अर्थच हा कीं इजिप्तशी, मिसरशीं लोथळचें दळणवळण होतें. दुसरी एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे, कीं दशरथ मरण पावल्यानंतर भरत आजोळाहून परत येईपर्यंत त्याचें प्रेत मसाला भरून ठेवण्यांत आलें होतें, असें कांहीं भारतीय संशोधकांचें मत आहे. त्यांत आमचे भास्करराव जाधव एक आहेत!

लोथळच्या लोकांच्या कलाकौशल्याचें कितीतरी नमुने आम्ही पाहिले. मोर करकोचे, सांबर, साप, चिमणी वगैरे विविध जातींचें प्राणी या लोकांनीं भांड्यांवर रंगविले आहेत. बैल, बकरा, हत्ती, पक्षी वगैरेंचीं सुंदर चित्रें अकीक व चेरी या सारख्या मौल्यवान् दगडांवर त्यांनीं कोरलीं आहेत. मातीचे बनविलेले गेंडे व गोरिला वानर या ठिकाणीं आढळले आहेत. हराप्पा येथील उत्खननामध्यें देखील असे कांहीं अवशेष सांपडले आहेत. तेथें वाघांच्या देखील मातीच्या आकृत्या सांपडल्या आहेत. आज सिंधु नदीच्या खोऱ्यांत वाघ सांपडतात परंतु गेंडे आणि गोरीला वानर सांपडत नाहींत. परंतु पिगॉट म्हणतात, कीं चार हजार वर्षापूर्वीची येथील हवा या रानटी श्वापदांच्या वास्तव्यास अनुकूल असावी.

आम्ही येथें कांहीं वजनें पाहिलीं. तसेंच 'ट्रेड मार्क' ही पाहिले. कांहीं वस्तूंवर आम्हांला कांहीं विशिष्ट प्रकारचे छाप आढळले. हे छाप तांब्याच्या व स्टीटाईटच्या सीलाचे होते. आतांपर्यंत अशी कल्पना होती, कीं विविध जातींचे छाप असलेल्या वस्तू बहुधा बाजूबंद अथवा इतर अलंकारासारख्या वापरण्यांत येत असाव्यात. परंतु कांहीं वस्तूंवर ज्या दोरीच्या खुणा आढळल्या त्यावरून या वस्तूंचो लोथळमधून परदेशांत पाठविल्या जात असाव्यात असा अंदाज बांधतां येतो.

आणि हें सर्व साडेचार हजार वर्षापूर्वी या आजच्या गुर्जर भूमींत चाललें होतें. साडेचार हजार वर्षापूर्वींचे येथील लोक परदेशाशीं व्यापार करीत. त्यांचे मिसर मेसेपोटेमिया

(पान ५२ वर चालू)




# बुलंदशहराचा दरोडा



*भर दिवसा इंपीरियल बँकेच्या खजिन्यावर दरोडेखोरांनीं हल्ला केला आणि ७०' हजार रुपये लंपास केले ... एक चारित्र्यवान पुरुष हा दरोडा घालील असं कसं कुणाला वाटेल ?—त्या दरोड्याचा श्री. अत्तरसिंग यांनीं कसा तलास लावला त्याचीं सुरस कहाणी*

२ एप्रिल १९५३ ची गोष्ट. अलिगढ अनुपराहर या रस्त्यावर दरोडेखोरांनीं इंपीरियल बँकेच्या खजिन्यावर दरोडा घालून ७० हजार रुपये आणि एक बंदुक पळवली. भर दिवसा घातलेला हा साहसी दरोडा म्हणजे या भागांतील लोकांची मनें सुन्न करणारी एक आश्चर्यकारक घटना.

अलिगढच्या इंपीरियल बँकेची एक शाखा बुलंदशहर जिल्ह्यांतील दिबाई या गांवीं आहे. अलिगढ आणि बुलंदशहर मधील अंतर अवघें २५ मैलाचें आणि आठवड्यांतून दोनदां किंवा तीन वेळां बरीच मोठी रक्कम एक बसमधून पाठविण्यांत येत असे. दरोडेखोरांनीं ही गोष्ट नेमकी हेरली होती. त्यादिवशीं सकाळीं ११ वाजतां बँकेचा कॅशियर आणि एक बंदुकधारी रखवालदार अलिगढहून सुमारें ७० हजार रुपयांच्या करंन्सी नोटा असलेली एक तिजोरी घेऊन दिबाईला जायला निघाले. उतारूंची वाहतूक करणाऱ्या या बसमध्यें दोन वर्ग होते. पहिला आणि दुसरा. रखवालदार नेहमीं दुसऱ्या वर्गात एका सीटवर बसे. आणि त्याच्या शेजारी तिजोरी ठेवण्यांत येई. शिवाय ही तिजोरी लोखंडी साखळीनें सीटच्या खालच्या दांडीला बांधलेली असे.

चंद्रसेन

बस बरोबर ११-३० वाजतां अलिगढहून सुटली आणि सोळाव्या मैलावर छतरी नांवाच्या गांवाजवळ आली. मैलाच्या दगडाजवळ एक हिरव्या रंगाची मोटार उभी होती. इतक्यांत ड्रायव्हरच्या मागें बसलेल्या उतारूनें मला इथं उतरायचं आहे असं सांगितलं. ड्रायव्हरनें गाडीचा वेग मंदावला आणि त्याबरोबर तो उतारू उतरला.

गाडीचा वेग मंदावतांच त्या हिरव्या मोटारींतून सहा सशस्त्र इसम तीरासारखे बसजवळ आले आणि त्यांनीं बसच्या समोरच्या टायरवर गोळ्या झाडल्या आणि त्यांनीं बसला वेढा घातला. बसमध्यें पाठीमागें जे इसम बसले होते त्यांतील तीन इसमांनीं बँकेच्या रखवालदाराला घेरले आणि त्याची बंदूक हिसकावून घेतली आणि त्याच्यावर रिव्हॉल्वर झाडून त्याचा उजवा हात जायबंदी केला आणि त्यानंतर डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच त्यांनीं तिजोरीच्या शांखळ्या तोडल्या आणि तिजोरी आपल्या हिरव्या गाडींत् ठेवली.

हा सर्व प्रकार घडत असतांना बसमधील इतर सर्व उतारू भयानें थरथर कापत होते. त्यांच्या डोळ्यांदेखत ते सर्व दरोडेखोर—त्यांत उतारूंमध्यें बसलेले चार दरोडेखोरहि सामील झाले—आपल्या हिरव्या मोटारींतून दिबाईच्या रोखानें पसार झाले.



अनुक्रमणिका



## त्यांतुनि कां फुलतो आहे....

आज निजेच्या पंखावरती
 दिवस उद्यांचा जागत राहीं
आभाळामधिं उभवून माथा
 कांठावरती टेंकून वाही
निळ्या रेशमी अभ्रझग्यावर
 तलमधुक्याची शाल रुपेरी
जुईपुष्पांची नक्षी तयावर
 आणि पितांवर सोनमन्हेरी
ओठावरती मधांत निजलें
 गीत फिकेसें निशिगंधाचें
माथ्यावरती तुरे खोंवले
 हिरव्या हिरव्या मोरपिसांचे
अर्ध्या मिटल्या डोळ्यांमधुनि
 ढळवा ओला थेंब दवाचा
त्यांतुनि कां फुलतो आहे
 मोती उद्यांच्या भवितव्याचा ?

— पुष्पा त्रिलोकेकर

दरोडेखोर दिसेनासे झाल्यावर बसचे दोन कंडक्टर ९ मैलांवर असलेल्या पोलीस स्टेशनवर वर्दी देण्यासाठीं गेले. कॅशियरनें जखमीं रखवालदाराला अलिगढच्या इस्पितळांत दाखल केलें आणि पोलिस सुपरिंटेंडेंटला फोनवरून गुन्ह्याची माहिती कळविली. पोलिसांनीं आजुबाजूच्या सर्व पोलीस स्टेशनावर सावध राहण्यासाठीं सूचना पाठवल्या आणि नाक्या नाक्यावर हिरव्या रंगाच्या मोटारीच्या पाळतीवर राहण्यासाठीं संदेश पाठवला.

अलिगढ दिवाई रस्त्यावर नारायणपूर या गांवापर्यंत पोलिसांनी हिरव्या गाडीचा माग केवळ चाकांच्या खुणावरून काढला. नारायणपुरला चौकशी केली तर कळलं कीं हिरव्या रंगाची मोटार मुरादपूरच्या दिशेनें गेली. मुरादपूर येथें केलेल्या चौकशीवरून असें आढळलें कीं अहमदगढच्या रस्त्यावर जंगलांत एका ठिकाणीं दरोडेखोरांनीं एक पेटी जाळली. जळलेल्या तिजोरीची सांखळी, स्क्रू खिळे अशा वस्तु पोलीसांच्या हातीं आल्या. या ठिकाणाहून बारा मैलांवर अहमदगढ हें ठिकाण. तेथून गाडी शिकारपूर येथें गेली असें कळलें. शिकारपूर येथें तर गाडींत एकच माणूस होता अशी बातमी लागली. आणि शिकारपूरहून गाडी कोठें गेली हें कुणालाच सांगता येईना.

पोलिसांनीं अहोरात्र जंग जंग पछाडले, पण हिरव्या रंगाची मोटार आणि त्यांतील दरोडेखोर कोठें गेले याचा त्यांना पत्ता लागेना. बँकेमधल्याच कुणी तरी माणसानें आंतली बातमी दिली असावी असा लोकांचा संशय. कदाचित् कॅशियर अगर बसचा ड्रायव्हरहि या कटांत सामील असावे असा लोकांचा तर्क. शेवटीं पोलिसांनीं तपासाचें काम सी. आय. डी. कडे सोंपवलें. उत्तर प्रदेश सी. आय. डी. चे एक चलाख इन्स्पेक्टर श्री. अत्तर सिंग यांनी हा तपास मोठ्या कौशल्यानें सुरू केला. हिरव्या रंगाची गाडी कोणा तरी वाटसरूला अगर लॉरी ड्रायव्हरला दिसली असली पाहिजे म्हणून त्या मार्गावर वाहातुक करणाऱ्या सर्व लॉरी ड्रायव्हरना विचारण्यांत आलें.

एका लॉरी ड्रायव्हरनें शेवटीं पोलिसांना अत्यंत महत्त्वाचा दुवा दिला. २ एप्रिलला आपण शिकारपूरहून भर वेगांत जातांना हिरव्या रंगाची D. L. H. 7054 या नंबरची एक मोटार पाहिली. गाडींत ड्रायव्हरशिवाय दुसरें कोणीच नव्हतं. आणि भरवेगांत जात असल्यामुळें समोरून येणाऱ्या एका सायकल स्वाराची आणि त्याची टक्करच व्हायची. पण इतकं करूनहि गाडी थांबली नाहीं. तिनं आपला वेग कमी केला आणि सायनाच्या रस्त्यानें गेली.

या माहितीचा धागा हातीं घेऊन पोलिसांनीं तपास सुरू केला. या तपासाअंतीं शेवटीं असें कळलें कीं बुलंदशहरपासून चार मैलांवर असलेल्या तातरपूर या गांवीं दिल्लीला राहाणाऱ्या बाबू रामा नांवाच्या इसमानें २-४-५३ ला एक हिरव्या रंगाची गाडी आणली आणि ४ तारखेला ती गाडी घेऊन तो दिल्लीला परत गेला. त्याच्याबरोबर त्याचा भाऊ किसनलाल हाहि होता.

ही बातमी मिळतांच पोलिस लागलीच दिल्लीला गेले. पण दिल्लींतहि बाबू रामा आणि त्याचा भाऊ किसनलाल यांचा पत्ता लागला नाहीं. पण शेवटीं दिल्लींत कनॉट सर्कसजवळ एक्स्पर्ट गॅरेजमध्यें ५-४-१९५३ ला पोलिसांना हिरव्या रंगाची गाडी सांपडली. ही गाडी बाबू रामानें ४ तारखेला दुरुस्तीसाठीं दिली होती. पोलिसांनीं गाडी ताब्यांत घेतली पण दिल्लींत तपास करूनहि त्यांना बाबू रामा आणि त्याचा भाऊ यांचा पत्ता लागला नाहीं.

पण ६ तारखेला पोलिसांना किसनलाल सांपडला. किसनलालनें कबूल केलें कीं बाबू रामानें २९ मार्चला दिल्लीहून गाडी नेली आणि ४ एप्रिलला परत आणली. आपला मित्र रतनलाल याच्या कुणा तरी नातेवाईकाच्या लग्नासाठीं आपण गाडी बाहेर नेणार आहोंत असेंहि बाबू रामानें आपल्या भावाला सांगितलें होते. रतनलाल आणि बाबू रामा हे जिगरदोस्त असल्यामुळें किसनलालनें दिल्लीच्या बाहेर गाडी न्यायला परवानगी दिली आणि त्याप्रमाणें ते दोघेहि गाडी घेऊन निघाले.

या बातमीच्या अनुरोधानें पोलिसांनी ७ एप्रिलला रतनलालच्या घराची झडती घेतली. तेव्हां ४ एप्रिलला ५७० रु. पोस्टांत ठेवल्याची एक पावती मिळाली व ६ तारखेला २०० रु. मनीऑर्डरनें बाहेर पाठविल्याची पावती मिळाली. हे पैसे बहुतकरून लुटींतील पैशांपैकीं असावेत.

पोलीसांनीं ८ तारखेला रतनलालला अटक केली. त्याला पोलीसांनीं व्यवस्थित छेडलं. शेवटीं बाजू अंगावर आली असें पाहातांच










रतनलालनें गुन्हा कबूल केला. पण आपल्या सहकाऱ्यांपैकीं पुरुषोत्तम-देव गौतम आणि प्रेमसिंग हे लुटीचा पैसा घेऊन फरारी झाले आहेत असें सांगितलें.

१२ एप्रिलला पोलिसांना बाबू रामा सांपडला. बाबू रामानें दरोड्याची सर्व कांहीं माहिती दिली. पुरुषोत्तमदेव या गाजलेल्या दरोडेखोराच्या नियंत्रणाखालीं आपण हा दरोडा घातला असें त्यानें सांगितलें. बाबू रामाची जबानी पोलिसांनीं १८ एप्रिल १९५३ रोजीं तुरुंगांत मॅजिस्ट्रेटच्या समोर घेण्यांत आली. बाबू रामाचा मित्र जनकसिंग याच्याकडे पोलिसांना ३००० रुपये सांपडले. हे पैसे रतनलालनें त्याच्याकडे ठेवायला दिले होते.

पोलिसांना बाकीचे सगळे गुन्हेगार सांपडले पण पुरुषोत्तम देव गौतम सांपडला नव्हता. खरं पाहिलं तर पुरुषोत्तमचा लौकिक फारच मोठा. १९४२ सालीं तो राजकीय कार्यकर्ता म्हणून तुरुंगात होता. १९४९ सालीं तो सोशलसर्विस कँपमध्यें होता. १९५० सालीं सब-इन्स्पेक्टरच्या कोर्ससाठीं तो पोलिस ट्रेनिंग स्कूलमध्यें दाखल झाला होता. १९५० सालीं तो उत्तर प्रदेशच्या इंटकच्या शाखेचा लीगल ॲडव्हायसर म्हणून काम पहात असे. १९५१ सालीं त्यानें आग्रा येथें प्रजा सोशलिस्ट पक्षातर्फे झालेल्या सत्याग्रहांत भाग घेतला होता. १९५२ साली जैन ग्लास वर्क्सच्या संपांत भाग घेतला म्हणून त्याला अटक झाली होती.

आणि ही केस कोर्टांत चालू असतांनाच तो पोलीस कस्टडींतून पळाला आणि त्याला पकडून देणाऱ्यासाठीं ५०० रु. चें बक्षिस लावलें होतें. त्यानंतर त्याची आणि भूपेन्द्र सिंग आणि प्रेमपालसिंग या विद्यार्थ्यांची ओळख झाली. आणि याच विद्यार्थ्यांच्या आणि इतरांच्या मदतीनें त्यानें बुलंदशहरचा दरोडा घातला.

आतां या पुरुषोत्तम देवला कसा पकडायचा ? २० जानेवारी १९५४ रोजीं उत्तर प्रदेशचे वाहातुक मंत्री हसरतला भेट देणार होते. त्याठिकाणीं त्यांना राजकुमार नामक एक कॉंग्रेस कार्यकर्ता चहा देणार होता. हा चहापान समारंभ घडवून आणणारा राजकुमार दुसरा तिसरा कोणी नसून ख्यातनाम दरोडेखोर पुरुषोत्तम देव आहे अशी माहिती पोलिसांना लागली. मंत्र्याबरोबर चहापान समारंभ आटपून बोनाई येथें भूदान चळवळीबाबत बोलावण्यांत आलेल्या एका सभेला गेला. पोलिसांनीं आपली पूर्ण खात्री करून घेतल्यावर बोनाई येथें पुरुषोत्तमला पकडण्यासाठीं गेले. पुरुषोत्तमनें पोलिसांना पाहून पळण्याचा यत्न केला. पण अखेर पोलिसांनीं त्याला घेरलेंच.

अखेर सर्व आरोपींवर खटला भरण्यांत आला. पुरुषोत्तमला १० वर्षें सक्तमजुरीची शिक्षा झाली. व त्याच्या इतर सहकाऱ्यांनाहि ५ ते ८ वर्षांपर्यंत सक्तमजुरीच्या शिक्षा झाल्या.

सर्व आरोपींनीं हायकोर्टाकडे अपील केलें पण तें फेटाळलें गेलें.

● ● ●








अनुक्रमणिका

*शरीराचे सारे अवयव भरगच्चपणें वाढत असतां माझं नाकच तेवढं थिटं कां ?—मी काळजी घेतली नाहीं तर कांहीं वर्षांनीं माझ्या नाकाच्या जागीं फ्रँकेस्टाइनप्रमाणें फक्त दोन भोकें उरतील…कां ? असं कां ?…*




**— मो. ग. रांगणेकर**

**मा**झें नाक थिटें कां ?

हा प्रश्न माझ्या अनेक आप्तेष्टांना पडला आहे. कारण जन्मानंतर मला हॉस्पिटलांत पाहावयाला येणाऱ्या आप्तमंडळीच्या नजरेंत प्रथम कांहीं भरलें असेल, तर तें माझें भलें-मोठें नाक. माझ्या नाकाचें तें क्षेत्रफळ तसेंच आजतागायत कायम राहिलें असतें, तर आज फ्रान्सचा जनरल द गॉल याचा मी सहज नक्षा उतरवला असता, असें मला पाळण्यांत पाहिलेले माझे आप्त म्हणतात. पण पायांतली वहाण झिजावी त्याप्रमाणें इतकीं वर्षें माझें नाक झिजत जाऊन तें आतां एवढें थिटें झालें आहे, कीं माझ्या बसकट चेहऱ्याला कांहीं निराळीच कळा आली आहे. त्यामुळें कांहीं दिवसांपूर्वी एक नेपाळी माणूस माझ्याशीं नेपाळी भाषेंत बोलूं लागला आणि एका गुरख्यानें रात्रपाळी-साठीं एक नोकरी असल्याची मला माहिती दिली. माझे मित्र तर माझ्या तोंडावर सुद्धां कधीं कधीं म्हणतात, कीं मी चीन अगर जपानला गेलों आणि नेमकें त्यावेळीं त्या दोन देशांत युद्ध सुरू झालें, तर मला चिनी म्हणून पकडतील आणि जपानी म्हणून सोडून देतील !

शरीराच्या सर्व अवयवांत नाकाला एवढें महत्त्व कां प्राप्त झालें आहे, हें कळणें कठीण आहे. माझी अशी कल्पना होती, कीं नाक हें लहान मुलांना शेंबडासाठीं, स्त्रियांना नथीसाठीं आणि पुरुषांना मरतेवेळीं सूत धरण्यासाठीं ईश्वरानें दिलेलें असावें. पण नाकाचे परिस्थितीप्रमाणें इतरही अनेक बरे-वाईट परिणाम दिसून येऊं लागून, त्याचें भलतेंच स्तोम माजत असलेलें पाहिलें, तेव्हांपासून दररोज सकाळीं उठल्याबरोबर प्रथम आरशांत कालच्यापेक्षां आज माझे नाक आणखी थिटें झालें आहे काय, हें पाहाण्याचा मला छंद जडला. पण कुंडींतलें फुलझाड रोज किती वाढतें आहे हें कळणें जसें कठिण, तसेंच माझें नाक रोज किती थिटें होत आहे, हें समजणेंहि मला कठिण झालें. दोनचार महिन्यांनीं मला भेटणारा एखादा माणूस मात्र माझ्या नाकांतला हा फरक चटकन् जाणूं शकतो. कारण त्याची नजर एकदम माझ्या नाकावर स्थिर होते व त्याच्या चेहऱ्यावर सहानुभूति दिसूं लागते. कांहींजणांनीं तर अशीही भीति व्यक्त केली आहे, कीं मी काळजी घेतली नाहीं तर आणखी कांहीं वर्षांनीं फ्रँकेस्टाइनप्रमाणें माझ्या नाकाच्या जागीं फक्त दोन भोकें उरतील !

माझें नाक असें थिटें कां झालें ?

माझ्या आयुष्याचें मी सिंहावलोकन करतों, तेव्हां माझे नाक असें वहाणेंप्रमाणें झिजत कां चाललें आहे या विचारांनीं मी बेचैन होतों. अनेक सर्जनांना मी माझी प्रकृति—मुख्यत्वें नाक दाखवलें. पण त्यांना या रोगाचें निदान करतां येईना. शरीरांतला दुसरा कुठलाच अवयव झिजत नसतांना नाक तेवढेंच झिजत जावें, हा वैद्यकीय जगांत अद्भुत चमत्कार असल्याचें एका प्रसिद्ध स्कँडेनेव्हिअन सर्जनानें उद्गार काढले. महारोगानें हातापायाचीं बोटें, त्याच-प्रमाणें शरीराचे निरनिराळे अवयव झिजतात. पण माझ्या बाबतींत तसें कांहींच झालें नव्हतें. उलट कांहीं अवयव तर वाजवीपेक्षा वाढत होते. मूळचें लहान डोकें, हवा भरल्याप्रमाणें तंबोऱ्याच्या भोपळ्यासारखें मोठें झालें होतें. (त्या मापाची टोपी आख्यां





अनुक्रमणिका

मुंबईंत मिळत नसल्यामुळें मला उघड्या बोडक्यानें फिरावे लागतें. त्यामुळें मी कम्युनिस्ट असल्याचा लोकांचा गैरसमज होतो. ) माझी हातापायाची बोटेंहि दरोडेखोरासारखी जाड होत चालली आहेत. कान दरमहा लांब होत असल्याचें आसपासची माणसें शपथेवर सांगतात. भूकही अशी वाढली आहे कीं, सिंधी लोकांप्रमाणें रस्त्यांत उभें राहून कांहीं खाण्यासहि मला दिक्कत वाटत नाहीं. मला तशा स्थितींत कोणी ओळखीच्या माणसानें पाहिलें तरी मी बेपर्वाईनें त्याच्याकडे पाहून नाक उडवतो—म्हणजें तसा प्रयत्न करीतो. त्यावेळीं माझें नाक थिटें असल्याची मला तीव्रतर जाणीव होते.

आयुष्यांत कांहीं वेडेवांकडें केल्यामुळें माझें नाक कापलें असतें तर गोष्ट निराळी होती. पण तसा प्रकार माझ्या हातून कधींच घडला नव्हता. मला एका मुलींच्या शाळेंत शिक्षकाची नोकरी मिळाली असूनही मी निष्कलंक राहिलो होतों. त्या शाळेंत एकही पुरुष शिक्षक नसतांना मला बिनधोकपणें त्या शाळेंत नोकरीस ठेवावें, हा एखाद्याला त्या शाळेच्या अधिकाऱ्याचा मूर्खपणा वाटेल पण माझ्यापासून तरुण मुलींना कसलाच धोका पोंचण्याची शक्यता नाहीं, याबद्दल शाळेच्या अधिकारी वर्गाला (माझ्या चेहऱ्याकडे पाहून) पूर्ण विश्वास वाटत होता. त्यामुळें नैतिकदृष्ट्या माझें वर्तन धुतल्या तांदळासारखें समजलें जाई. कुणाहि मुलीच्या मनांत माझ्याबद्दल पापबुद्धी निर्माण होण्याचा संभव नव्हता. माझ्या या थिट्या नाकामुळें त्यांचें–व माझेंहि–शील शाबूत राहिलें होतें. हा एकच तेवढा थिट्या नाकाचा मला फायदा दिसून आला. माझें लग्न कसें होऊं शकलें, याचाहि मला ओळखणाऱ्या अनेकांना विस्मय वाटे. पण लग्नासाठीं स्त्रियांप्रमाणें पुरुषाच्या रूपाचा कधींच विचार केला जात नाहीं, ही सामाजिक विषमताच याला कारण असावी, असें कांहीं जणांचें म्हणणें आहे.

अखेर एके दिवशीं माझ्या थिट्या नाकाचें गूढ उकललें. मला माझ्या थिट्या नाकाबद्दल जो उलगडा झाला, तो एके दिवशीं माझी पत्नी एका 'जरेपुराणवाल्या'ला बोलावून त्याला सर्व रद्दी विकण्यास सरसावली त्यामुळें. ती काय विकावयाला निघाली आहे, याची तिला कल्पना नव्हती. तिला वाटलें, तीं केवळ जुनीं वर्तमानपत्रें विकीत आहे. पण खरें पाहातां माझे आतांपर्यंत निरनिराळ्या विषयावरील लेख ज्या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाले होते, तीं मी जपून ठेवलेलीं वर्तमानपत्रें ती खुशाल साडेपांच आणे रत्तलाच्या भावानें विकायला निघाली होतीं. मी जरेपुराणवाल्याला वाटवून दिलें. त्यानें रद्दीचा भाव वाढवला तरी मी तीं वर्तमानपत्रें विकायला तयार झालों नाहीं. माझ्या या अव्यवहारी दृष्टीबद्दल माझ्या पत्नीनें मला नांवें ठेवलीं. पण माझ्या लेखनाचें मोल, इतर लोकांप्रमाणें, माझ्या पत्नीलाही अद्याप आकलन झालेलें नाहीं हें मला माहित असल्यामुळें मी तिच्याकडे दुर्लक्ष केलें आणि आरशांत पाहिलें. नाक आणखी थिटें झालेलें दिसलें. मन दुसरीकडे वेधून टाकावें, म्हणून मी त्या वर्तमानपत्रांतील माझे लेख पाहूं लागलो. किती वेगवेगळ्या विषयावर मी लेखन केलें होतें ! म्युनिसिपालटीनें ठिकठिकाणीं रस्ते खोदून नागरिकांची केलेली गैरसोय, एस. टी. च्या प्रवाशांचे हाल, दूधवांटप केंद्रावरील अव्यवस्था, रेल्वेच्या प्रवासांतील अडचणी, ट्राम बंद झाल्याबद्दल गरीब जनतेची झालेली पंचाईत वगैरे दैनंदिन अडचणीवर लिहिलेलीं हृदयस्पर्शी वाङ्मयीन पत्रें त्यांत मला आढळलीं. शिक्षक-परिषदेंतील उणिवा, टेक्स्टबुकें व गाइडस्, शिक्षण खात्यांतील बजबजपुरी, पोलियोची साथ, भाडेकरूंवरील अन्याय, साखरेचा व तांदळाचा काळाबाजार, चिनी सैन्याची हिंदुस्थानाच्या सीमेवर हालचाल, गोमंतकाचा प्रश्न, नेहरूनंतर कोण, माघी गणेशोत्सव वगैरे विविध विषयावर वेळोवेळीं लिहिलेले टीकात्मक अभिजात लेख मी अभिमानानें पुन्हापुन्हां वाचूं लागलों व त्यांतील महत्त्वाचीं वाक्यें जवळच तांदूळ निवडीत बसलेल्या पत्नीला वाचून दाखवूं लागलों. पण नेमकी त्यावेळीं ती तांदळांतले खडे काढून बाजूला फेंकून देई. त्यानंतर मी नाट्यविषयावर लिहिलेल्या लेखमाला मला आढळल्या. त्यांत तर मी माझी लेखणी जॉर्ज वॉशिंग्टनच्या कुऱ्हाडीपेक्षांही लिलेनें चालवली होती. ते लेख वाचून कोणालाही वाटावें, कीं मराठी रंगभूमीचा मूळ जनक विष्णुदास भावे नसून मी आहे ! मोठमोठ्या इंग्रजी पुस्तकांतील वाक्यें वापरून मी सर्वांना थक्क करीत असे. आणि प्रचलित समजुतींना धक्का देऊन त्यांचें माझ्याकडे लक्ष वेधीत असे.

उदाहरणार्थ, (१) अण्णा किर्लोस्करांनीं नाटकें लिहिण्यापेक्षां, त्यांच्याच आडनांवाच्या लोकांनीं पुढें नांगर निर्माण केले त्याप्रमाणें शेतीच्या आयुधांकडे लक्ष पुरवलें असतें, तर महाराष्ट्र बहुजनसमाजाचा दुवा घेतला असता.

(२) देवल यांनीं आजन्मांत जॉन्सन वाचला नसतांनाहि नाटकें लिहिण्याचा अव्यापारेषु व्यापार केला. वास्तविक, त्यांचा पिंड स्टेनलेसचीं भांडीं तयार करण्याचा.

(३) बालगंधर्वांनीं जन्मभर कमरेभोवती फक्त उंची पातळें गुंडाळली आणि आंबटशौकी माणसांनीं त्यांच्यावर जीव कुर्बान केला. पण लुगडें कसें नेसतात आणि अभिनय कशाशीं खातात, हें बालगंधर्वांना या जन्मीं तरी कळलेले नाहीं. त्यांच्या संगीताचा तर माझ्यावर कधींच परिणाम झाला नाहीं.

(४) गणपतराव जोशांना 'महाराष्ट्राचा गॅरिक' म्हणणारे महाभाग धन्य होत ! एक मामुली साधा नट म्हणून सुद्धां ज्याची योग्यता नाहीं, त्याला नटसम्राट म्हणून डोक्यावर घेणें, हें फक्त आपल्या अडाणी महाराष्ट्रांतच शक्य आहे !

(५) महाराष्ट्रांत अजून नाटककार असा झालाच नाहीं. कारण या नाटककारांनी वुइलियम मॅक्सविनी, जॉर्ज स्टीव्हिन्सन, एडगर लिनलिथगो हे पाश्चात्य नाटककार वाचलेले नाहींत. त्यामुळें त्यांची नाटकें थिटीं झालीं आहेत.

असे हल्ले चढवून मी रंगभूमीची दाणादाण उडवली. मुंबईंत आलेल्या कमला सर्कसपेक्षां झेकॉस्लोव्हिकन ही पाश्चात्यांची सर्कस श्रेष्ठ असल्याचें (दोन्ही सर्कशी न पाहातां) केवळ मराठी भाषेच्या जोरावर मी प्रतिपादन केलें होतें. गामानें झिस्कोला चीत केलें, तरी देशी गामानें परदेशी झिस्कोपासून शिकण्यासारखें खूप आहे, हें मी त्याला सुचवलें होतें. नंदू नाटेकरच्या खेळांतील

उणिवा आणि नेणिवा; विनू मन्कडच्या बोलिंगमधील थिटेपणा; देव आनंद—राजकपूर—अशोककुमार यांची वस्तुनिष्ठ अभिनयाचें प्रत्ययकारक प्रात्यक्षिक प्रकट करण्याची असमर्थता; हॅम्लेट, अथेल्लो, वगैरे भूमिका करणाऱ्या मराठी नटांना या भूमिकांच्या वाटेला न जाण्याचा उपदेश करतांना "हॅम्लेट, अथेल्लो, मॅकबेथ इत्यादि उन्मनस्कांच्या व्यक्तित्वांची गूढचेष्टितें म्हणजे महामनस्क शेक्सपीयरच्या प्रतिभाबळाची अम्लान स्फुरणें होत" असा दिलेला इषारा वगैरे वगैरे मी लिहिलेलें कितीतरी बहुमोल वाङ्मय त्या रद्दींत मला सांपडलें. माझ्या लेखणीनें स्पर्श केला नाहीं असा पृथ्वीतलावरील एकही विषय नव्हता. प्रत्येक विषयांत मी नाक खुपसलें होतें—

आणि हाय! त्यामुळेंच माझें नाक कणाकणानें झिजत जाऊन आज एवढें थिटें झालें आहे, याचा मला चटकन् उलगडा झाला!

यापुढें मी लेखनसंन्यास घेण्याचें ठरवलें आहे. कारण आतां कुठें खुपसण्यासाठीं मला नाकच उरलेलें नाहीं!

• •

(पान ४६ वरून चालू)

टायग्रीस, युफ्रेटिस, आलीरवा वगैरे देशांशीं दळणवळण होतें.

हे लोक ज्या अर्थी परदेशाशीं व्यापार करीत असत, त्यावरून ते शांतताप्रिय होते. ते शेतकरी होते. ते व्यापारी होते. त्यांनीं संरक्षणासाठीं किल्ले बांधल्याचें आढळत नाहीं. त्यांनीं आत्मरक्षणासाठीं अथवा दुसऱ्यावर आक्रमण करण्यासाठीं शस्त्राची निर्मिती केली नाहीं. आणि म्हणून त्यांच्या जीवनांत कधीं शस्त्रसंन्यासाचा प्रश्न निर्माण झाला नाहीं.

लोथळहून अहमदाबादला परत येत असतांना माझ्या मनांत अनेक प्रश्नांचा कल्लोळ निर्माण झाला होता. हराप्पा येथून पांचशें मैल दक्षिणेला वसती करून राहिलेले हे कलानिपुण व नागर संस्कृतीनें युक्त असे लोक कोण होते? त्यांच्या घरासमोर यज्ञकुंड होते, ते पशु-यज्ञ करीत असत, त्यावरून ते यज्ञ-संस्थेचे पुरस्कर्ते जे आर्य लोक त्यांचे वंशज होते का? त्यांच्या काळांत मृतांना पुरत असत, नवराबायको एकत्र पुरलेलीं अशीं तीन थडगीं सांपडलीं, त्यावरून त्यांच्यामध्यें दफनाच्या पद्धतीप्रमाणेंच सती जाण्याची देखील चाल होती का? त्यांनीं योजनाबद्ध नगरें वसविलीं, यावरून त्यांचा समाज आचारविचारानें सुसंस्कृत बनला होता का? असे एक ना अनेक प्रश्न!

आणि शेवटीं जो प्रश्न माझ्या मनांत घोळत राहिला तो हा—साबरमती व भोगावो या दोन नदींच्या मुखावरील हें लोथळ जें समुद्राच्या मार्गावरील बंदर होतें; तेथे सागराच्या पोटांतील शंख-शिंपले यासारखा एकहि अवशेष सांपडूं नये, हें आश्चर्यच नव्हे का?

मला वाटतें त्यांची चित्रलिपीची भाषा आम्हांला समजेल तेव्हांच या मृतांच्या नगरीवर खराखुरा प्रकाश पडेल! • • •

(चित्रें On Looker च्या सौजन्यानें.)

(पान ५३ वरून चालू)

डाव्या गटाची चिथावणी म्हणून या निदर्शनांची उपेक्षा केली खरी; पण अखेर किशीला जनमतापुढें माघार घ्यावी लागून प्रे. आयसेनहॉवर यांची जपान भेट रद्द झाली. वास्तविक पाहातां आयसेनहॉवर यांच्या सल्लागारांना अध्यक्षांची जपान भेट रद्द होणें मंजूर नव्हतें. कारण त्यामुळें अमेरिकेची जगांत जी मानहानि होणार ती त्यांना कसेंहि करून टाळावयाची होती. पण अखेर जें अमेरिकेला नको होतें तेंच झालें.

२० मेला किशी यांच्या लिबरल डेमोक्राटिक पार्टीनें सुरक्षा कराराला मान्यता दिली. ह्या करारानें जपानला संरक्षण मिळेल अशी जी सर्वसामान्य जनतेंत भावना होती ती केव्हांच नष्ट झाली. कारण हेरगिरी करण्यासाठीं अमेरिका ज्या राष्ट्रांचें विमानतळ वापरील ते विमानतळ आम्ही क्षणांत नष्ट करून टाकू अशी रशियानें धमकी दिल्यापासून जपानसारखें राष्ट्र विनाकारण मनांत नसतांना या युद्धाच्या खाईत लोटलें जाईल अशी भीति जपानी नागरिकांच्या मनांत निर्माण झाल्यास त्यांत नवल नाहीं. या सुरक्षा करारांतील महत्त्वाच्या कलमांचा सारांश पुढीलप्रमाणें—

१ दोन्ही राष्ट्रें या कराराच्या अंमलबजावणीसाठीं एकत्र येतील आणि जपानची अगर आंतरराष्ट्रीय शांतता धोक्यांत आल्यास एकजूटीचा प्रयत्न करतील.

२ दोन्ही राष्ट्रें कुणाच्याहि जपानशासित प्रदेशावर शत्रुचा हल्ला झाल्यास त्याचा प्रतिकार घटनात्मक रीत्या करतील.

३ जपानच्या सुरक्षेसाठीं आणि आंतरराष्ट्रीय शांततेसाठीं अमेरिकेला जपानमधील सैन्य, आरमार आणि हवाई दल आणि कोणताहि भूप्रदेशाचे साहाय्य घेतां येईल.

नागासकी आणि हिरोशिमाचे भयंकर परिणाम प्रत्यक्ष भोगलेल्या जपानी राष्ट्राला हा सुरक्षा करार एकप्रकारें जपानला पुनरपि धोक्यांत आणणारा करार वाटल्यास नवल तें काय?

### पुण्यांतील कॉंग्रेस अधिवेशन

गेल्या महिन्यांत ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या पुणें येथील अधिवेशनांत कमिटीच्या सभासदांनीं नेहरूंच्या विरुद्ध मतदान करून पंडितजींना आणि एक प्रकारें देशांतील कॉंग्रेस कार्यकर्त्यांना आश्चर्याचा धक्काच दिला. वर्किंग कमिटीचे एकतृतीयांश सभासद निवडणुकीनें नियुक्त केले जावेत अशा अर्थाच्या उपसूचनेवर त्या उपसूचनेला पंडितजींचा पाठिंबा असतांनाहि ए. आय्. सी. सी. नें विरोधी मतप्रदर्शन करून कॉंग्रेस श्रेष्ठींच्या समोर पेंचप्रसंग निर्माण केला. मात्र या प्रकरणीं कॉंग्रेस अध्यक्ष संजीव रेड्डी यांचें सभांतून संचालन किती भोंगळ होतें याचा प्रत्यय आला. आणि त्यामुळें त्यानंतर रेड्डींनीं एक खास पत्रक काढून ए. आय. सी. सी. नें पं. नेहरूंच्या विरुद्ध मतप्रदर्शन केलें असलें तरी त्यांच्या नेतृत्वावर आमचा पूर्ण विश्वास आहे. आणि तेच आमचे सर्वश्रेष्ठ मार्गदर्शक नेते आहेत असा खुलासा केला. पण ही सारवासारव कितीहि समर्पक असली तरी आतां पंडितजी थकले आहेत आणि यापुढें त्यांची कॉंग्रेसवरची पकड हळुहळूं ढिली होत जाणार आहे असेंच सर्वसामान्य कॉंग्रेस कार्यकर्त्यांच्या निदर्शनास आलें. आणि त्यामुळें ए. आय्. सी. सी. समोर पंडितजींनी आपल्या परराष्ट्र दौऱ्यासंबंधीं आणि आंतरराष्ट्रीय बाबीसंबंधीं जें विस्तृत वक्तव्य केलें त्यांत नवें आणि उद्बोधक असें कांहींच नव्हतें.

— पिनाकि














## समाजकारण

### महाराष्ट्राचा औद्योगिक विकास

संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर महाराष्ट्राच्या विकासासंबंधीं चर्चा आणि परिसंवाद घडवून आणले जात आहे. माणूस हा मुळांतच उत्सवप्रिय असतो पण मराठी माणूस हा चर्चाप्रिय असतो. पण आजकाल मराठी माणसाच्या चर्चेची तात्विक बैठकच ढासळली आहे कीं काय अशी शंका येऊं लागली आहे. कारण साधना आणि कल्चरल फ्रीडम (ही कसली युति ?) यांच्यातर्फे घडवून आणण्यांत आलेला परिसंवाद आणि महाराष्ट्र इकॉनामिक डेव्हलपमेंट कौन्सिल यांच्यातर्फे घडवून आणण्यांत आलेल्या चर्चेची फलश्रुति नेहमींप्रमाणें निराशाजनक ठरूं नये ही इच्छा. कारण म्हणजे मराठी माणसाला उद्योगधंद्यासंबंधीं फारसें प्रेम नाहीं आणि तो त्याला जमत नाहीं. त्याची श्रेष्ठ आकांक्षा म्हणजे प्राध्यापक, वकील अगर सरकारी नोकर. म्हणजे मराठी रक्तांतच उद्योगधंद्याची धमनी नाहीं. त्यासाठीं लागणारी चिकाटी, निष्ठा कार्यकुशलता, संघटनाचातुर्य, कष्ट करण्याची, आणि विशेषतः पडेल तें काम करण्याची प्रवृत्ति महाराष्ट्रीयांत नाहीं. शिवाय महाराष्ट्रांतील शिक्षित तरुणांचें या क्षेत्राकडे फारसें लक्ष नाहीं आणि असलें तरी त्याला वाव नाहीं. त्यामुळें किर्लोस्कर, डहाणूकर, ओगले अशी इन मीन तीन नांवे सोडल्यास महाराष्ट्रांत उद्योगपतींचा दुष्काळच आहे असें समंजस माणसांना आढळेल. आणि त्यामुळें उद्यां महाराष्ट्राला उद्योगप्रवण करावयाचें असेल तर मराठी माणसाच्या शिक्षकी आणि सुखासीन-अल्पसंतुष्ट असा जीवनदृष्टिकोन बदलला पाहिजे. आणि त्यांत बदल घडवून आणणे जमलें नाहीं तर असे भोजनप्रिय तार्किकांचे परिसंवाद कितीहि घडवून आणले तरी ते व्यर्थ जातील.

## देशकारण

### विनोबांची शांतियात्रा

चंबळ खोऱ्यांतील आचार्य विनोबा भावे यांच्या शांतियात्रेबाबत मध्यप्रदेशचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस श्री. रुस्तमजी आणि मुख्यमंत्रि कैलासनाथ काटजू यांनीं जीं निवेदनें प्रसिद्ध केलीं तीं विनोबांच्या चाहात्यांना धक्का देणारीं असलीं तरी राज्यकर्त्यांना चिंतनीय आणि उद्बोधक आहेत. शेंकडों निरपराध खेडुतांचे बळी घेणाऱ्या दरोडेखोरांना विनोबांच्या सहकाऱ्यांनीं आणि अनुयायांनीं फार मोठी प्रसिद्धी देऊन वरच्या कोटींत बसविलें आणि एका परीनें शासनकर्त्यांच्या नैतिक सामर्थ्याला हादरा दिला यांत शंकाच नाहीं. विनोबांचे सर्वोदय कार्यकर्तें आज दरोडेखोरांच्या मुलाबाळांच्या पुनर्वस्तीसाठीं जनतेला आवाहन करीत आहेत, पण या दरोडेखोरांच्या सुरामारीस आणि गोळागोळीस बळि पडलेल्या खेडुतांच्या मुलाबाळांच्या अन्नवस्त्राबाबत कुणालाच फिकीर नाहीं. आज मानसिंग या कुप्रसिद्ध दरोडेखोराची पत्नी आपल्या शेंकडों एकर जमिनीची मालकी परत मिळावी म्हणून अर्ज विनंत्या करीत आहे. पण मानसिंगचा भाऊ नवाबसिंग याच्या जुलुमानें मानसिंगच्या राठोड खेरा या खेड्यांतील शेंकडो खेडूत घरेंदारें आणि जमिनी सोडून दुसरीकडे गेले आणि त्यामुळें ज्या मानसिंगची मूळची जमीन अवघी पांच एकर होती ती पन्नासवर वाढली. आतांपर्यंत या दरोडेखोरांनीं ३३६ माणसांची बेधडक हत्या केली. आग्रा जिल्ह्यांतील केवळ दोन तालुक्यांतच सुमारें २०० स्त्रियांवर या दरोडेखोरांनीं बलात्कार केले. आणि या खोऱ्यांतील एकूण ७०० दरोडेखोरांपैकीं फक्त १९ आणि तेहि पांगळे, हतबल, आजारी असे दरोडेखोर विनोबांना शरण आले. विनोबांच्या शांतिसेनेमागील हें कटुसत्य लपवितां येण्यासारखें नाहीं हें निश्चित.

## राजकारण

### जपानमधील पेंचप्रसंग

गेल्या महिन्यांत जपानमधील निर्माण झालेला राजकीय असंतोष म्हणजे आशियांतील राजकारणाला मिळालेलें एक नवें वळण. २० हजार जपानी विद्यार्थ्यांनीं पार्लमेंटच्या इमारतीसमोर अभूतपूर्व असें निदर्शन केलें. जपान-अमेरिका सुरक्षा करार आणि आईकची जपान भेट यांच्या विरुद्ध गेल्या महिन्यांत जीं निदर्शनें झालीं त्यांत एकूण २० लाख लोकांनीं भाग घेतला असावा. 'झेंगाकुरेन' ही विद्यार्थ्यांची संघटना आणि 'सोरियो' ही जपान ट्रेड युनियन कौन्सिलची प्रातिनिधिक संस्था यांच्यातर्फें निदर्शनांचा हा कार्यक्रम आंखण्यांत आला आणि तो चांगलाच यशस्वी झाला. सुरवातीस पंतप्रधान किशी यांनीं

(पान ५२ वर चालू)

[ पान ९ वरून चालू ]

त्या कादंबरीत रेखाटलेलें आहे.

ए. टी. डब्लू सिमिअन्स ह्यांच्या मूळ कथेचा आराखडा असा आहे. गोविंद नांवाचां एक शिंपी एका गांवांत आपला धंदा थाटून राहिलेला असतो. त्याचें दुकान भरभराटीस आलेलें असतें. गांवांत त्याला चांगला मान मिळालेला असतो. दुकानाच्या मागच्याच बाजूस तो राहात असतो. त्याच्या छोट्या पण स्वच्छ घरांत त्याची बायको सुमित्रा व त्याची दोन मुलें असतात आणि त्याचा इमानी नोकर रामू त्याच्या घरची झाडलोट करतो. एक दिवस एका गिऱ्हाइकाचा कोट दुरुस्त करीत असतां अचानक त्याचें बोट शिवणींत शिवलें जातें पण त्याला तें उमगत नाहीं. ह्या बधिरतेची त्याला चुटपुट लागते. त्याची बायको बाळंतपणासाठीं आपल्या पित्याच्या घरीं मुलांबाळांसह गेल्यानंतर तो डॉक्टरकडे जाऊन तपासून घेण्याचें ठरवतो. पण कामामुळें ते तसेंच राहून जातें. पण एके दिवशीं त्याची दाढी करणारा न्हावी त्याचा कान व कपाळ चाचपतां चचपता गंभीर होतो. गोविंदच्या डाव्या कानाची पाळी जाड झालेली असते व कपाळावर गोळे उठल्यासारखे दिसतात. न्हावी गोविंदला डॉक्टरकडे जाण्याचा सल्ला देऊन दाढी कशीबशी उरकून पैसे न घेतांच निघून जातो. आणखी एके दिवशीं तो दुकानांत बसला असतांना त्याचा पाय तापलेल्या इस्तरीला लागून त्याचीं बोटें भाजतात पण त्याला तें कळत नाहीं. ह्या सर्व घटनांनीं बावरून जाऊन तो डॉ. गोपालकडे जातो. तो त्याला तपासतो, चर्मरोगाचा अंदाज करतो व रक्ततपासणीसाठीं दुसऱ्या डॉक्टरला चिठी देतो. त्या डॉक्टरचा कारकून गोविंदच्या आग्रहावरून त्याला तपासणीचा अंदाज वाचून दाखवतो. गोविंदला कुष्ठ रोग झालेला असतो. गोविंद बेचैन होतो. कुष्ठ रोग्यांचे तिरस्कृत जीवन त्याला माहित असतें. तो त्याचा जुना मित्र रामकृष्ण पेंटर ह्याच्याकडे जातो आणि त्याला सर्व परिस्थिति सांगतो. त्याचा पुतण्या चंदू ह्याच्याबरोबर डॉ. जगन्नाथ ह्यांच्याकडे जाण्याचा सल्ला रामकृष्ण त्याला देतो. चंदू डॉक्टरांना गोविंद हा आपला भाऊ आहे म्हणून सांगतो. डॉक्टर जगन्नाथ गोविंदला तपासतात आणि त्याला कुष्ठ रोग झाला असल्याचें सांगून मुलाबाळांपासून दूर राहाण्याचा सल्ला देतात. ह्या रोगाचें भीषण स्वरूप त्याच्यापुढें उभे करून तो कसा असाध्य आहे व त्यांतून रोगी अपवादात्मकच सुधारूं शकतात असे सांगतात. चंदूला ह्याची कल्पना नसते पण त्याचा भाऊ कुष्ठरोगी म्हणून त्याची नोकरी त्याच दिवशीं सुटते आणि त्यामुळें तो त्या दोघांना आपणांस फसविल्याबद्दल शिव्या घालतो आणि नुकसान-भरपाई म्हणून गोविंदकडून शंभर रुपये उकळतो. गोविंदच्या ह्या रोगाची बातमी गांवभर होते—त्याचें दुकान ओस पडतें, नोकर सोडून जातात, त्याला धड जेवणहि मिळण्याची मारामार पडते. अखेरिस घरमालक त्याला जागाहि सोडायला लावतो. सर्व सामान-सुमान पडत्या भावांत विकून गोविंद रामकृष्णाच्या घरीं येऊन राहातो. ह्या सभोंवतालच्या परित्यक्त वातावरणांत तोच त्याला देवासारखा पाठिराखा होतो. एके दिवशीं त्याच्या सासऱ्याकडून पुत्रजन्माची बातमी त्याला तारेनें कळते आणि तो ती पोचल्याची तारही सासऱ्याला करतो. इतक्या अवधींत गोविंदच्या परिस्थितीची बातमी सासऱ्याला कळते आणि गोविंदाला तो सविस्तर पत्र पाठवतो. रामकृष्णच्या सल्ल्यानें गोविंद सासऱ्याला सर्व परिस्थिति कळवणारे सविस्तर पत्र पाठवतो—बायकोमुलांना संभाळण्याची विनंती करतो आणि शिलकी पैसेहि गोविंद त्याला पाठवतो. आपला सर्व ऋणानुबंध कायमचा तुटला गेला आहे हें कळवतांना त्याच्या जिवावर येतें पण प्राप्त परिस्थितींत तोच एक उपाय असतो. त्याच्या बायकोला ही परिस्थिति समजतांच ती तान्ह्या मुलासह अचानक एक रात्रीं रामकृष्णाच्या घरीं येऊन थडकते पण दारांतच गोविंद तिला दुरूनच सर्व सांगून तिचें मन वळवतो व तो परतते. कांहीं दिवसांनीं गोविंदचा एकमेव आधार रामकृष्ण आजारी पडतो व मरतो आणि मग चंदू अचानक उगवून गोविंदची त्या घरांतूनही हकालपट्टी करतो. त्यानंतर गोविंदच्या जीवनाची कुतरओढ सुरूं होते. तो गांवाबाहेर भटकत निघून जातो. पदरीं थोडेसे पैसे असतात पण दिवसा त्या पैशानेंही त्याला खाणें विकत घेणें शक्य होत नाहीं. अंधारांत तोंड लपवून कुठें तरी चणेफुटाणे घेऊन तो पोट भरत असतो. अखेर एका गांवांतल्या देवळाच्या पायऱ्यांवर दुसऱ्या कुष्ठ रोग्यांच्या संगतींत भिक्षा मागत बसण्याची त्याच्यावर पाळी येते. तिथल्याच एका तांड्यांतील कुष्ठरोग्यांची त्याची दोस्ती जमते. त्या तांड्यांत वावरणारी पण एक निरोगी तेरा वर्षांची चुणचुणीत पोरगी सीता त्याचें लक्ष वेधून घेते. ती त्या तांड्यासाठीं सर्व बाजार हाट करते. गोविंदच्या पैशानें ती त्याला एक कांबळ, गोणपाटाची पिशवी, एक पत्र्याचें टिनपाट इत्यादि भिकाऱ्याची सामग्री आणून देते. हा तांडा भीक मागण्यासाठीं हिंडत असतांना सीता एके ठिकाणीं चोरी करूं पाहते व तिला पोलीस पकडतो. पण त्यांतून ती सुटते आणि तिची आई शांती व दुसरे एकदोन भिकारी ह्या मोठ्या तांड्यांतून निघून दुसऱ्या गांवीं जातात व गोविंदची व तिची ताटातूट होते. सीतेला एक नवीन फ्राक शिवून आणण्याचें त्यानें तिला आश्वासन दिलेलें असतें पण तें पुरें होण्यापूर्वींच ती त्याला सोडून जाते. पुढें ही टोळी दौलतपुरच्या जत्रेला जास्त भिक्षा मिळण्याच्या आशेनें मार्गस्थ होते. जत्रेंत त्यांना खाणें, पैसे, कपडे मिळतात. पण जत्रा ऐन संपण्यापूर्वीं त्या गांवांत कालरा सुरू होतो आणि मग गांवकरी आणि ही कुष्ठरोग्यांचीं टोळी कालऱ्याची वाट चुकवीत रस्ते तुडवीत पुढेंपुढें जाते. साथीमुळें उपासमार घडते पण रोगी झाला तरी त्याला जीव प्यारा असतोच. कसेतरी जीवन जगत-जगत पावसाळा सुरू होण्याच्या सुमारास ही टोळी बिजाबादच्या परिचर्या केंद्रापाशीं येते. ही संस्था मिशनरी लोकांनीं चालविलेली असते. टोळीचा नायक बापू गोविंद व टोळींतील एक बाई प्रेमला ह्यांना ह्या केंद्रांत दाखल होण्याचा सल्ला देऊन टोळी पुढें निघून जाते. आपल्या जीवनांत पुन्हां एकदां प्रकाश येईल या आशेनें गोविंद हॉस्पिटलचें सीमित जीवन पत्करतो. तिथे त्याची देखभाल चांगली राखली जाते आणि तो सुधारत जातो. पावसाळा संपायच्या वेळीं बापूची टोळी हॉस्पिटलकडे वळते. दरवानाला पैसे देऊन गोविंद हळुच बापूला जाऊन भेटतो. ते त्यांची व प्रेमलेची चौकशी करतात. गोविंद






अनुक्रमणिका

त्यांना आपली दिनपरिचर्या सांगतो. [illegible] त्याला सीतेची आठवण येते व तो बापूकडे तिची चौकशी करतो पण त्यांना ती मधल्या काळांत भेटलेली नसते. गोविंदला हॉस्पिटलमधलीं बंधनें अस्वस्थ करतात. त्याला टोळींतला खुला दिनक्रम पसंत असतो. आणि म्हणून तो हॉस्पिटलमधून पुन्हां टोळींतून सटकण्याचा बेत ठरवतो. टोळींतल्या सदाशिवचें आर्त गायन त्याला पुन्हां एकदां अस्वस्थ करतें. पण बापू त्याला पुन्हां एका वर्षानें भेटण्याचें—टोळींत परत घेण्याचें आश्वासन देतो. गोविंद विपण्ण चित्तानें पुन्हां हॉस्पिटलांत परततो. हॉस्पिटलांतले निष्क्रीय जीवन गोविंदला दिवसेंदिवस अधिकच अस्वस्थ करीत असतें. हॉस्पिटलांतल्या रुग्णांचीं पत्रें वाचणें, त्यांचीं उत्तरें लिहिणें हें काम पत्करून त्यावर तो कमाई करूं लागतो. त्याची प्रकृति सुधारण्याची आशा वाटते न वाटते तोंच वर्षअखेरच्या तपासणींत रोगाचे जंतु वाढले असल्याचें आढळून येतांच त्याची अधिकच निराशा होऊन तो बेपर्वाईकपणें पुन्हां वागूं लागतो. एके दिवशीं पुन्हां बापूची टोळी येते आणि ह्यावेळीं मात्र गोविंद हॉस्पिटल सोडून त्यांच्यांत पुन्हां सामील होतो. हा चांगला सुसंस्कृत माणूस उत्कृष्ट व्यवस्था असलेल्या हॉस्पिटलचें स्वच्छ व आरोग्यदायक वातावरण त्यजून भटक्या व रोगट वातावरणाचें जीवन पत्करतो हें पाहून हॉस्पिटलच्या डॉक्टरना आश्चर्य वाटतें. पण ते नाइलाजानें त्याला जाण्याची परवानगी देतात. प्रेमलेचा निरोप घेऊन, तिला थोडे पैसे देऊन गोविंद टोळींत येऊन सामील होतो. त्या रात्रीं गोविंद वाटेंत दारू पिऊन तर्र होतो. टोळीची भ्रमंती सुरूं होते आणि गोविंद त्या जीवनांत रमतो. एके दिवशीं वाटेंतल्या एका गांवच्या बाजारांत प्लेगचे उंदीर पडल्याची बातमी गांवभर होते. गांवकरी गांव सोडून इतस्ततः पळूं लागतात. आणि ह्या टोळींतलें लोकहि त्या गांवापासून दूर दूर जाण्यासाठीं घाईघाईनें मार्ग काटत असतात. गोविंद आपल्या हॉस्पिटलला पत्र लिहून प्लेगवर उपयोगी औषध मागवतो आणि वाटेंतल्या एक दोन रोग्यांवर त्याचा प्रयोग करून त्यांना बरेंहि करतो हें पाहून टोळीवाले गोविंदला मानूं लागतात. वाटेंत गांव ओस पडल्यामुळें त्यांची उपासमार होते. चण्याकुरमुऱ्यांवर त्यांना जीव जगवावा लागतो. ते जंगलांत शिरतात आणि झाडांचीं फळें व मासे खाऊन अर्धपोटी राहातात. जंगलांत एका ओढ्याच्या जवळ गोविंदला सीता दिसते, तो पाण्यांतून पलिकडे तिच्याकडे धांवत जातो. इतक्या वर्षांच्या प्रतीक्षेनंतर त्याचा ठेवा त्याला सांपडलेला असतो. आतां ती साडी वापरणारी तरुणी झालेली असते. ती आपला मधल्या काळांतला इतिहास सांगते. तिची आई प्लेगला बळी पडलेली असते आणि निराधार होऊन चुनिलाल नांवाच्या एका इसमाच्या ताब्यांत असते. पूर्वीं गोविंदला एका गांवांत भेटलेला द्वारकादास नांवाचा इसमच हें नवें नांव घेऊन देहविक्रयावर आपली तुंबडी भरत असतो. त्याच्याकडे ती दोघें येतात. तो सीतेला आपल्या ताब्यांतून सोडण्यास तयार नसतो. मग बापूकडे ही तिघें येतात आणि सीतेसाठीं चुनिलालकडे बापू रदबदली करतो. त्यांची बोलाचाली वाढते आणि मग प्रकरण मारामारीवर येऊन टोळींतला हरी व इतर जण बापूच्या बाजूस येतात. धक्काधक्कींत बापू पडतो व त्याच्या वर्मीं मार लागून तो मरतो. हें पाहून हरी चुनिलालवर•

*या महिन्यांत गाजलेली व्यक्ति*

# नोबुशुके किशी



भारतीयांना जपानी मालाचीच आजपावेंतो चांगलीच माहिती होती. त्या मानानें जपानमधील विचित्र नांवाचे राजकीय पुढारी आमच्या कानांवरूनहि कधीं गेले नव्हते.

पण याला सामान्य अपवाद म्हणजे जपानचे पंतप्रधान नोबुशुके किशी. नोबुशुके याचा अर्थ विश्वास. पण आज आपल्या पंतप्रधानावरचा अखिल जपान राष्ट्राचा विश्वास साफ उडला आहे. आज किशी इतकी अप्रिय व्यक्ति जपानमध्यें दुसरी कोणतीच नसेल.

पदवी परीक्षा पास झाल्यावर १६ वर्षांनीं किशी दाखल झाले ते जपान सरकारच्या व्यापार खात्यांत एक अधिकारी म्हणून. त्यानंतर मांचुरिया येथील नाममात्र जपानी सरकारचे औद्योगिक सल्लागार म्हणून किशी यांची नियुक्ति झाली. मांचुरियांत जनरल टोजो आणि किशी यांचे स्नेहसंबंध दृढ झाले आणि टोजो अधिकारावर आल्यावर किशी यांची जपानचे व्यापारमंत्री म्हणून नेमणूक झाली. जपानच्या युद्धविषयक मोहिमांत किशींनीं प्रामाणिकपणें भाग घेतला आणि युद्धांत जपाननें शरणागति पत्करल्यावर किशींनाहि युद्धगुन्हेगार म्हणून अटक करण्यांत आली. तीन वर्षांनीं किशींची तुरुंगांतून मुक्तता झाली. आणि त्यानंतर किशी क्रमाक्रमानें चढत चढत पंतप्रधानकीच्या जागेवर गेले. पण बुद्धिसामर्थ्याच्या जोरापेक्षां राजकीय डावपेंच खेळूनच किशींना ही जागा मिळाली. जपानमधील वृत्तपत्रांना किशींबद्दल फारशी सहानुभूति कधींच नव्हती. विशेषतः 'याईनीची' आणि 'योमुहरी' या दोन पत्रांनीं सुरक्षा बिलाच्या निमित्तानें किशीवर चांगलेच प्रहार केले.

आयसेनहॉवर यांच्या जपान भेटीच्या वार्तेनें जपानमध्यें जो प्रक्षोभ उसळला त्याला तोंड देण्याचा किशींनीं फार प्रयत्न केला. रोज टेलीव्हिजनवर निर्भयतेचा मुखवटा पांघरून किशींनीं राष्ट्राला आवाहन करण्याचा यत्न केला. पण अशा प्रकारच्या निदर्शनाचा किशींना हा पहिलाच अनुभव नव्हे. गेल्या जानेवारींत अमेरिकेशी









अनुक्रमणिका

सुरक्षा करारावर सही करण्यासाठीं किशी अमेरिकेला गेले तेव्हां त्यांच्या वाटेवर आणि विमानतळावर जपानी तरुणांनीं उग्र निदर्शनें केली.

आणि आज जपानमधील वाईट परिस्थितीला सर्वस्वी किशीच कारणीभूत आहेत असें सर्व वृत्तपत्रांचें एकमत आहे.

त्यामुळें आज किशी जरी स्थानभ्रष्ट झाले तरी जपानला मुळींच धक्का बसणार नाहीं. १९४७ च्या पहिल्या निवडणुकीपासून तो आजपावेतों जपानचें सहा वेळां पंतप्रधान बदलले आणि नऊ मंत्रिमंडळे कोलमडून टाकली. आणि याला प्रामुख्यानें त्या त्या मंत्रिमंडळाचें परराष्ट्रीय धोरण कारणीभूत झालेलें आहे.

हा इतिहास समोर असूनहि किशींचें प्रामाणिक मत असें कीं, अमेरिकेशीं स्नेहभाव राखूनच जपानचें कल्याण होईल आणि त्या मुळेंच नोबुसुकेवरचा जपानचा विश्वास ढळला आहे. ● ● ●

---

धांवून जातो व त्याचा गळा दाबून प्राण घेतो. बापूच्या मृत्यूनें टोळीचा आधारच नाहींसा होतो. बापूला एका खड्ड्यांत पुरून व चुनिलालला संपूर्णपणें लुबाडून टोळी वाटेला लागते. आतां हरी टोळीचें म्होरकेपण पत्करतो कारण त्याच्यापाशींच चुनिलालचे सर्व पैसे असतात. हरीची नजर सीतेकडे विशेष लक्ष देऊन तिला गोविंदपासून फोडण्याचा प्रयत्न करीत आहे हें सीता गोविंदला सांगते आणि पुढील धोका ओळखून ती पळून जाण्याचा सल्ला गोविंदला देते. एके रात्रीं तीं दोघे पळून टोळीपासून दूर जातात. हरीला फसवून त्याच्याकडून पळवलेले दागिने व चुनिलालचें पैसे भरलेलें पाकीट सीता गोविंदला दाखवते. त्या पैशांतून ते आगगाडीचें तिकीट काढून चिखलवाडी नांवाच्या गांवाला जातात. त्या गांवांत गेल्यावर सीता अन्न व कपडे विकत आणते. ते पोटभर जेवतात आणि माळावर रात्रीं जातात. त्या रात्रीं सीता नवीन साडी व दागिने घालून गोविंदसमोर उभी राहाते आणि तिचें सुंदर रूप पाहून गोविंदचा मोह अनावर होतो आणि त्या रात्रीं माळावर दोघांचे मीलन होतें. त्या दोघांचे मुक्त सुखी जीवन आतां सुरू झालें. मधून मधून गोविंदला सुमित्रेची व आपल्या गोड छोकऱ्यांची आठवण येई व चालू जीवनामुळें त्यांच्याशीं होत असलेली प्रतारणा उमजून तो अस्वस्थ होई. सीता आतां गर्भवती होती आणि त्यामुळें तर सीतेचा विश्वासघात करण्याचा विचारही मनांत आणणें त्याला पटलें नसतें. पण अचानक एके दिवशीं सीता विजाबादला निघून गेल्याचा निरोप गोविंदला मिळतो आणि गोविंदला पुन्हां एकदां धक्का मिळतो. आतां तो पुन्हां एकटा एकाकी होतो. भटकत भटकत तो पुढें जातो. पुन्हां त्याचा कुष्ठरोग बळावतो आणि जीवनावरची त्याची पकड पुन्हां सैल होऊं लागते. विषण्ण चित्तानें तो भटकत भटकत 'पार्क' नांवाच्या कुष्ठधामाच्या दारांत येऊन पोंचतो. तिथलें वातावरण त्याला पुन्हां आशावादी करतें. त्या रुग्णालयाचे प्रमुख डॉ. गोडबोले त्याला तपासतात आणि त्याला ठेवून घेतात. गोविंदला तिथला दिनक्रम आवडतो आणि तो पुन्हां एकदां आशेनें तिथलें औषधपाणी व परिचर्या पत्करतो. त्याची प्रकृति सुधारूं लागते. डॉ. गोडबोले एका विशिष्ट औषधाचा त्याच्यावर प्रयोग करतात व त्यामुळें त्याच्यावर अनुकूल प्रतिक्रिया होऊन तो रोगमुक्त होतो. तिथल्या एका रुग्णाकडून त्याला कळतें कीं बीजाबादच्या रुग्णालयांत सीता नांवाची एक बाई अतिशय आजारी असतां दाखल होऊन त्या आजारांत मरण पावते. भटक्या जीवनांतला अखेरचा आशामय तंतु ह्या बातमीनें तुटतो. आतां सुमित्रा व त्याची मुलें त्याच्या डोळ्यासमोर सारखीं येतात. अखेरच्या डॉक्टर तपासणीनंतर तो निरोगी झाल्याचें समजतांच त्याला आनंद होतो. पण त्याला देखरेखीसाठीं आणखी एक वर्ष तिकडे कंठावें लागतें. एके दिवशीं डॉक्टर गोडबोले त्याच्या सासऱ्याला गोविंदच्या रोगमुक्ततेबद्दलचें पत्र लिहितात आणि त्याचा सासरा प्रत्यक्ष तिथें येऊन पोहोंचतो. गोविंदला पाहून त्याला आनंद होतो, आणि सुमित्रा व मुलांना घेऊन एका परगांवीं पुन्हां एकदां नवीन संसार थाटण्यासाठीं लवकरच येण्याचें आश्वासन देऊन त्याचा सासरा परततो. 'पार्क' सोडतांना आपल्याजवळ असलेली लुटीची माया गोविंद हॉस्पिटलला दान करतो व कुष्ठरोग बरा करण्याच्या इलाजांवर ते खर्च करण्याची विनंति करून डॉक्टरना ते पैसे स्वीकारण्याची गळ घालतो. अशा तऱ्हेनें गोविंदच्या दुर्दैवाचा फेरा संपून पुन्हां गोविंद आपल्या मुला-माणसांत नवें जीवन सुरू करतो.

हें सर्व कथानक तपशीलानें देण्याचें कारण कीं सिमिअन्स ह्यांची मूळ कादंबरी किती सुरेख व सहृदयपणें विणलेली आहे हे वाचकांच्या ध्यानांत यावें तसेंच श्री. ठोमरे ह्यांनी ह्या कादंबरीचा केलेल्या अनुवादाचें तुलनात्मक परिक्षण करतां यावें हाहि एक उद्देश आहे.

'ऋणभारांत' ठोमऱ्यांनीं विशद केलेल्या भूमिकेशीं ते प्रामाणिक राहिले असते तर प्रस्तुत अनुवादाची स्तुति इतर वर्तमानपत्री परमार्षकांपेक्षां प्रस्तुत लेखकानें कदाचित् कांकणभर जास्तच केली असती. श्री. ठोमरे हे माझे स्नेही आहेत. त्यांचें लेखन मी निष्ठेनें व आवडीनें वाचलेलें आहे व माझी आवडनिवड स्पष्टपणें त्यांना सांगण्याचें धैर्य मी दाखवलें आहे. आणि म्हणून त्यांच्या प्रस्तुत अनुवादाचें कठोर परिक्षण करण्याचें काम मीं पत्करलें आहे.

अनुवादकानें आवश्यक वाटल्यास संक्षेप करावा पण तो जिथें पाल्हाळ असेल तिथेंच. इतरत्र कात्री लावणारा कलाकृतीचें सौंदर्य विघडवून कसा टाकतो ह्याचें उदाहरण प्रस्तुत अनुवाद आहे. मूळ कादंबरीचे पहिले तीन भाग ठोमऱ्यांनीं सर्वसाधारणपणें मूळ कथानकाशीं मिळते जुळते अनुवादित केले आहेत. पण चवथ्या भागांत त्यांनीं मूळ लेखकाला गुंडाळून ठेवून आपल्या कल्पनाशक्तीला चाकोरीबाहेर स्वैरपणें वावरूं दिलें आहे.

गोविंद बिजाबादच्या रुग्णालयांतून बाहेर पडतो इथून चौथा भाग सुरू होतो. मूळ कथानकांत प्लेगच्या उठावामुळें टोळीची उपासमार होऊन ते सर्व जंगलांत जातात असें आहे व तिथें सीता गोविंदला पुन्हां भेटते असें दाखवलें आहे. ठोमऱ्यांनीं आपल्या कल्पनाशक्तीनें शिवरामला (गोविंदला) रानांत एकटाच सोडून टोळी पळून जाते असें दर्शवून त्याला एका बैलगाडींतून थेट स्टेशनवर पोंचून 'मिरज कोल्हापूरकडच्या पार्क'चं तिकिट काढून त्याला गाडींत बसवून वेगानें कथानक पुढें नेलें आहे. ठोमऱ्यांनीं निर्माण केलेल्या स्टेशनच्या बुकिंग क्लार्कच्या सोयीसाठीं दक्षिणेंत भटकणाऱ्या शिवरामला मध्यप्रदेशांत भटकायला लावून 'सिक्स्टीन् अप्'नें




कल्याणच्या गाडींत बसवलें आहे. पोर्टरच्या व त्याच्या संभाषणांत 'मलमाड' अगोदर येतें ह्याचा उल्लेख आहे. ह्यावरून सुज्ञ वाचकांनीं रेल्वेचा नकाशा तपासून कथावस्तुची जाणीव करुन घ्यावी. रुग्ण शिवरामला ठोमऱ्यांनीं इगतपुरीला पुरीभाजी खायला दिली आणि बुकिंग क्लार्कच्या सूचनेप्रमाणें चिखलवाडीला जाण्यासाठीं कल्याणला गाडी बदलायचा त्याचा त्रास वाचवण्यासाठीं तीच गाडी थेट मुक्कामीं नेऊन शिवरामला फटफटीत पहांटेला नेऊन सोडलें आहे. असें करण्यांत श्री. ठोमऱ्यांनीं मूळ कादंबरींतल्या महत्वाच्या पात्राला-सीतेला गाळून शिवरामच्या आयुष्यांतल्या महत्वाच्या घटना अनावश्यक ठरवल्या आहेत. एवढेंच करून ठोमरे थांबलेले नाहींत. त्यांनीं (त्यांच्यामतें मूळ लेखक लोकजीवनाच्या तपशीलांत तोकडा ठरल्यामुळें) डॉक्टर गोडबोल्यांना पार्कमध्यें प्रार्थनामंदिरांत धोतर, नेहरू शर्ट आणि शाल पांघरवून गीताईचें प्रवचन करायला लावून व त्याच्या जोडीला गायत्री मंत्र आणि बंगाली गीताचा जयघोष करवून आंतरभारतीचें वातावरण निर्माण केलें आहे. ह्यानंतर ठोमऱ्यांनीं शिवरामचें दुर्दैव परिणामकारकतेनें रंगवण्यासाठीं सुमित्रेला महिलाश्रमांत ठेवून ट्रेनिंगचें शिक्षण पुरें करावयास लावलें आहे, मुलांना बोर्डिंगमध्यें ठेवलें आहे, व त्या सर्वांचा समाजकंटकांकडून (महारोग्याचीं मुलें) छळ करविला आहे. एवढ्यानेंच पुरे होणारे नव्हीं कीं काय म्हणून बालबोधी वास्तववादासाठीं बायकोमुलांना कादंबरीच्या अखेरीस हॉस्पिटलांत आणून त्यांची शिवरामशीं भेट घालून देऊन शेवट 'गोडच गोड' करून कादंबरी संपवली आहे. अशा तऱ्हेनें मूळ कादंबरीचे चार-पांच व सहा भाग काटून छाटून एकत्र करून चार भागांत परिपूर्ण व सुटसुटीत अनुवाद बनवून वेळींच हात आवरला आहे. वानगीदाखल अनुवादकांच्या किमयेचें हें एक उदाहरण जरी मीं दिलेलें असलें तरी सबंध अनुवादांत अनेक ठिकाणीं श्री. ठोमऱ्यांनीं रंधा फिरवून कथानकांतले खड्डे उंचवटे गुळगुळीत केल्याचें प्रत्ययास येतें. शिवरामच्या हातमशिनींचे पायमशिनींत रूपांतर केले, कुष्टरोग्यांच्या पदरीं असलेल्या चिल्लरीचें नोटांत रुपांतर केलें, शिवरामच्याऐवजी हॉस्पिटलच्या दरवानाला बापूच्या टोळीची मार्गप्रतीक्षा करायला लावली आहे, अशी किती उदाहरणें देतां येईल.

कादंबरीचा 'सेल' व्हायला त्यांत थोडा शृंगार अगर कामोद्दीपक वर्णनें असणें आवश्यक आहे हा ठोमऱ्यांचा व्यावहारिक हिशोब त्यांनीं इथें कसा जमवला आहे ह्याचें फक्त एकच उदाहण देतों. मूळ कादंबरींत गोविंद पॅथॉलॉजिकल् लॅबोरेटरींत जातो त्यावेळीं त्याला तिथें नोकरीस असलेली गोरी बाई दिसते. मूळ कादंबरींत तो तिच्याकडे पहातो असें सांगितलें आहे पण अनुवादांत ठोमऱ्यांनीं तिची 'कर्पूरगौर गोरी गुलाबी गरगरीत पुष्ट मांडी, तिची नितळ त्वचा अन् तीवरील पिंगट भुरी लसलस करणारी लव' शिवरामला अधाशी, अतृप्त नजरेनें पुन्हां पुन्हां पहायला लावली आहे. एवढेंच नव्हे तर 'तिचा विमुक्त कचसंभार, अवखळ डोळे, रसरशीत ओठ, गोरा गळा, उभार वक्षस्थळ आणि तें दुभंगणारी घातकी पोकळी—पुष्ट नितंब, बाकदार जांघ आणि घट्ट निमुळत्या सुडौल पोटऱ्या' इत्यादि अंग प्रत्यंगांचें सखोल व उठाव वर्णन मूळ कादंबरींत लेखकाच्या तोकड्या स्त्रीदेहज्ञानामुळें राहून गेलें होतें तें ठोमऱ्यांनीं आपल्या अनुवादांत देऊन मूळ लेखकापेक्षां ह्याहि प्रांतांत आपण कसे अधिकारी आहांत हें सिद्ध केलें आहे.

आतां विचार करायचा म्हणजे कादंबरीच्या पात्रांच्या नांवांचा. वर दिलेल्या मूळ कादंबरीच्या कथानकावरून कुणालाहि उमजेल कीं मूळ लेखकानें आपल्या पात्रांना महाराष्ट्रीय वा इतर भारतीय नांवें दिली आहेत. पण ठोमऱ्यांना तें यथार्थ न वाटून त्यांनीं आपल्या पाळण्यांत सर्व पात्रांना घालून नामकरण विधि उरकून घेतला (किंबहुना ख्रिश्चन लेखकाच्या पात्रांचें शुद्धीकरण करुन घेतलें असेंहि म्हणावयास हरकत नाहीं.) कथानायकाचें 'गोविंद' हें चांगलें नांव बदलून त्याला 'शिवराम' केलें, पेंटर रामकृष्णाला 'बाबा मिस्त्री' (बाबुराव मिस्त्री बाबूराव पेन्टर ह्या न्यायानें) डॉक्टर गोपालला 'डॉक्टर वझे', प्रेमलाला 'अंबू', इत्यादि बदलांवर ठोमरे संतुष्ट न राहातां त्यांनीं गोविंदच्या तीन मुलांची नांवें मुकुंदा, अरुणा व मार्कंडेय, तसेंच मूळ कादंबरींतल्या अनामिक न्हाव्याचा देखील 'भाऊ बारक' बनवला आणि खुद्द मूळ लेखकाचा उद्धार करण्यासाठीं मिनिअन्सचा 'सिमन्स' करून टाकला. ही नांवें ठेवण्याबाबतची ठोमऱ्यांची भूमिका व्यवसायसंबंधी आदर्श नामावलि तयार करण्यासाठीं त्यांनीं केलेल्या सखोल संशोधनात्मक अभ्यासाचें पूर्णफल आहे व अनुवाद नवीन कादंबरी किंवा कथा, नाटकें, काव्यें लिहिणाऱ्या भावी लेखकांनीं ठोमऱ्यांच्या ह्या अभ्यासपूर्ण प्रयत्नांची जरूर दखल घ्यावी.

'सिंहाचा मुखवटा' ह्या कादंबरीच्या पुरस्कारांत काकासाहेब कालेलकरांनीं कुष्ठ रोगावर एक प्रबंध लिहिण्याचें पत्करून हळूंच जातां जातां ठोमऱ्यांचें लेखनस्वातंत्र्य गौरविलें आहे. पण त्या बरोबरच ते मूळ कादंबरी वाचण्याची शिफारस अत्याग्रहानें करतात हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. श्री. खांडेकरांनीं पळवाट काढून दुसऱ्याच एका कुष्ठ रोगावरील कादंबरीची महत्ता वर्णिली आहे. ह्यामुळें खुद्द अनुवादकाला 'ऋणभरांत' आपल्या 'स्वतंत्र कलाकृतीचें आणि एका उत्कृष्ट रूपांतराचें' गोडवे गाण्याची पाळी आली आहे.

हें 'स्वैर रूपांतर' करतांना ठोमऱ्यांनीं मूळ लेखकाला उंचावण्याची भूमिका मनांत ठेवली नसती तर, त्याच्या ठायीं असलेल्या त्याच्या पूर्वपरिचित अनुवादकाच्या शैलीनें हा अनुवाद उत्कृष्ट उतरला असता. पण मूळ लेखकाला मराठी समजत नाहीं ह्याची खात्री झाल्यामुळें, म्हणा अगर सध्यां दुर्मिळ असणारी मूळ इंग्रजी कादंबरी वाचकांना पडताळतां येणार नाहीं म्हणून कीं काय ठोमऱ्यांनीं प्रकाशकांच्या परवानगीनें आपली कारागिरी मुक्तपणें व सढळ हातानें केली आहे आणि त्यामुळें सुंदर झांजिबारी पोपट घरच्या तयार पिंजऱ्यांत मावत नाहीं म्हणून त्याची शेपटी व पिसें निर्घृणपणें कापून वर तीं अनावश्यक व सौन्दर्यविघातक होतीं असें समर्थन करण्याचा आव त्यांनीं आणला आहे.

'सिंहाचा मुखवटा' एवढेंच फक्त मूळ कादंबरीच्या नांवाचें इमानी रूपांतर करणाऱ्या ह्या कादंबरीच्या मुखवट्यांत सिंह फुटेंच न दिसल्यामुळें इसापनीतींतल्या सिंहाचें कातडें पांघरणाऱ्या प्राण्यासारखी ही कलाकृति दिसते एवढेंच नम्रपणें नमूद करावेंसें वाटतें.

( पान १७ वरून चालू )

उमजूच शकत नाहीं. पण लडाखचें संकट डोळ्यांसमोर दिसत असतांहि नेहरूंचा हा सर्व परराष्ट्रसंबंधविषयक दृष्टिकोन मला बरोबर वाटतो.

+ + +

पण मग पुढें काय ? लडाख लाल चीननें गिळून टाकला असता भारतानें स्वस्थ बसायाचें काय ? 'अति शहाण्याचा बैल रिकामा' अशी ही परिस्थिति वाटते. नेहरूंच्या परराष्ट्रसंबंधविषयक धोरणाचें जितकें अधिक सुविचारयुक्त व विद्वत्तायुक्त समर्थन करावें तितकें लडाखप्रकरण अपरिहार्य मानून स्वस्थ माशा मारीत बसावें असें अनुमान काढायचें काय ? मग विद्वत्ता आणि सुविचार यांच्या साहाय्यानें अपमानापुढें मान वाकविण्याचें अनुमान काढण्यापेक्षां माथेफिरूपणानें प्रतिकार करण्यास प्रवृत्त होणें हेंच योग्य नव्हे काय ? तें योग्य ठरणार नाहीं. आजच्या हायड्रोजन बॉंबच्या जगांत माथेफिरूपणाला जागा नाहीं. आणि सुविचाराचा रस्ता अगतिक झाला आहे असें नाहीं. लाल चीननें लडाख गिळल्याचा बोभाटा नेहरूंनीं आतां खूप केला आहे. आमच्यावर लाल चीननें आक्रमण केलें असून चीनचें व भारताचें पूर्वी खूप दुथड्यांनीं वाहणारें सारें प्रेम आटून गेलें हेंहि आतां जगाला कळलें आहे. चीनबाबत खास स्नेहाची अथवा वशिल्याची भाषा नेहरूंची बंद झाली असून अमेरिकेला त्यामुळें नेहरू व भारत यांबद्दल अधिक आपुलकी वाटूं लागली आहे. त्याबरोबरच गेल्या बारा वर्षांत जगाला युद्धापासून मागें खेचण्याचा प्रयत्न जो नेहरूंनीं केला त्याची उपयुक्तता पाश्चात्य राष्ट्रांना अलीकडे विशेष प्रकारें पटूं लागली असून भारताबद्दल व नेहरूंबद्दल त्यांना प्रेम वाटूं लागलें आहे. भारताच्या आर्थिक विकासास अधिक मदत करावी व भारतांतल्या लोकशाहीला टिकण्याला मदत करावी हाच मार्ग जागतिक शांतता व लोकशाही या दृष्टीनें योग्य आहे हें पश्चिमी राष्ट्रेंहि कबूल करूं लागलीं आहेत. चीननें भारताचा आणखी मुलुख जिंकल्यास मात्र माथेफिरूपणानेंहि युद्ध करण्याचें असें आतां जवळजवळ भारत सरकारनें ठरविलेलें दिसतें. असें युद्ध सुरू झाल्यास त्यांतून जागतिक युद्ध उद्‌भवण्याचा संभव आहे हें आतां चीनलाहि दिसूं लागलें असून चीन अमेरिकाविरोधी प्रचार अधिक निकरानें करूं लागला आहे. युद्ध होऊंच नये ही परिस्थिति सर्वोत्तम. पण भारत आणि चीन यांचें युद्ध सुरूं झालें आणि त्यांतून जागतिक युद्ध उद्‌भवलें नाहीं तर परिस्थिति फारच वाईट. आतां संभव असा दिसतो कीं रशियाला युद्ध नको असल्यामुळें चीनच्या आक्रमण-प्रवृत्तीला रशियानेंच आळा घातला पाहिजे. ही गोष्ट कदाचित् घडून आली तर जगांतील इतर कोणत्याहि राष्ट्रापेक्षां भारताला तें हितप्रद होईल. म्हणून चीनशीं फारसा प्रक्षोभ न वाढू देतां रशियाशीं सख्य ठेवण्याचा प्रयत्न नेहरू करीत आहेत. पण तिसरें महायुद्ध जर शेवटीं अपरिहार्यच ठरलें तर तें ज्या गेल्या १३ वर्षांत झालें असतें त्यांतील कोणत्याहि वेळेपेक्षां आजच्या परिस्थितींत होण्यांत भारत त्याला तोंड देण्याला अधिक समर्थ आहे. कारण येथें सर्वांगीण प्रगति बरीच झाली असून आज जगांतील बड्या राष्ट्रांचा स्नेहहि भारताला अधिक प्रमाणांत लाभला आहे.

+ + +

नेहरूंच्या परराष्ट्रधोरणाचें कदाचित् कोणास ओढून ताणून केलें असें वाटणारें पण माझ्या दृष्टीनें शास्त्रशुद्ध असलेलें हें समर्थन केल्यानंतर मला त्यांच्या अंतर्गत आर्थिक धोरणासंबंधानें असें बोलता येत नाहीं याबद्दल वाईट वाटतें. चीननें लडाखवर केलेल्या आक्रमणापेक्षां भारतावर आलेलें अधिक मोठें संकट म्हणजे सरकारला बाजारभाव स्थिर करतां येत नाहींत व नियोजन सुयंत्र चालविता येत नाहीं हें आहे. स्वतः नेहरूंनीं अनेक वेळां आर्थिक नियोजन पार पाडणें हाच चीननें आक्रमण मागें हटविण्याकरितां अवश्य तें सामर्थ्य वाढविण्याचा उपाय आहे असें अनेकदां म्हटलें आहे. पण आर्थिक नियोजनाच्या बाबतींत सर्वत्र अत्यंत ढिलाई चालू आहे. वॉल्टर लिपमन हिंदुस्थानांत येऊन येथील परिस्थिति पाहून गेले. आणि येथील लोकसंख्येचा वाढता वेग व येथील अन्नउत्पादनाची तुटपुंजी वाढ यांचा विचार करतां पुढील पांच-सहा वर्षांत हजारों माणसें उपासमारीनें पटापट मरूं लागतील एवढा धोका उत्पन्न झाला असूनहि येथें मोठमोठ्या पुढाऱ्यांना त्याचें कांहीं वाटतहि नाहीं, सर्वत्र सर्वजण सुस्त आणि आत्मसंतुष्ट आहेत हें लिपमननीं पाहिलें आणि आमच्या या जनावरी वृत्तीबद्दल आश्चर्य व्यक्त केलें आहे. सरकारला बाजारभाव स्थिर ठेवतां येत नाहींत हें एकटेंच संकट नसून सार्वत्रिक आर्थिक अनास्थेचें व अव्यवस्थेचें तें लक्षण आहे. येथें लोकशाही आहे हें म्हणणें ठीक आहे. पण ही कर्तृत्वशून्य लोकशाही आहे. इंग्लंडांतील कर्तबगार व नियोजनप्रवीण लोकशाहीच्या अगदीं विरुद्ध अशी ही लोकशाही आहे. कार्यक्षम आर्थिक संघटना उभारण्याची शक्ति नेहरूंत नाहीं, कॉंग्रेसमध्यें नाहीं, दुसऱ्याहि कोणत्या पक्षांत नाहीं. लोकशाही ही या अकार्यक्षमतेची नुसती सबब झाली आहे. हुकुमशाही आम्हांला नकोशी वाटते हें ठीक आहे. पण स्टालिननें अथवा मावत्से तुंगनें हुकुमशाहीनें कां होईना कार्यक्षम आर्थिक संघटना उभारली तशी आर्थिक संघटना आम्हांला हुकुमशाहीनें उभारता येत नाहीं व लोकशाहीनेंहि उभारता येत नाहीं. ही अंतर्गत आर्थिक दुर्बलता हा आमचा खरा दोष आहे. लडाखनें नेहरूंचें परराष्ट्रीय धोरण चुकीचें आहे असें मुळींच सिद्ध केलेलें नाहीं. पण कोणत्याहि राष्ट्राचें संरक्षणबल हें ७५ टक्के अंतर्गत आर्थिक बलावर अवलंबून असतें ही गोष्ट लडाखप्रकरणानें भारताच्या मनावर बिंबवली असती तर चीननें हा भारतावर उपकार केला असें मी मानलें असतें. नेहरूंचें आणि कॉंग्रेसचें नेतृत्व याबाबतींत फार अपुरें पडत असून इतर कोणीच त्यांची जागा भरून काढूं शकत नाहीं हें या राष्ट्राचें खडतर दुर्दैव होय.

• •

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.

अनुक्रमणिका






सुरक्षा करारावर सही करण्यासाठीं किशी अमेरिकेला गेले तेव्हां त्यांच्या वाटेवर आणि विमानतळावर जपानी तरुणांनीं उग्र निदर्शनें केली.

आणि आज जपानमधील वाईट परिस्थितीला सर्वस्वी किशीच कारणीभूत आहेत असें सर्व वृत्तपत्रांचें एकमत आहे.

त्यामुळें आज किशी जरी स्थानभ्रष्ट झाले तरी जपानला मुळींच धक्का बसणार नाहीं. १९४७ च्या पहिल्या निवडणुकीपासून तो आजपावेतों जपानचें सहा वेळां पंतप्रधान बदलले आणि नऊ मंत्रिमंडळें कोलमडून टाकली. आणि याला प्रामुख्यानें त्या त्या मंत्रिमंडळाचें परराष्ट्रीय धोरण कारणीभूत झालेलें आहे.

हा इतिहास समोर असूनहि किशींचें प्रामाणिक मत असें कीं, अमेरिकेशीं स्नेहभाव राखूनच जपानचें कल्याण होईल आणि त्यामुळेंच नोबुशुकेवरचा जपानचा विश्वास ढळला आहे. ● ● ●

---

धांवून जातो व त्याचा गळा दाबून प्राण घेतो. बापूच्या मृत्यूनें टोळीचा आधारच नाहींसा होतो. बापूला एका खड्ड्यांत पुरून व चुनिलालला संपूर्णपणें लुबाडून टोळी वाटेला लागते. आतां हरी टोळीचें म्होरकेपण पत्करतो कारण त्याच्यापाशींच चुनिलालचे सर्व पैसे असतात. हरीची नजर सीतेकडे विशेष लक्ष देऊन तिला गोविंदपासून फोडण्याचा प्रयत्न करीत आहे हें सीता गोविंदला सांगते आणि पुढील धोका ओळखून ती पळून जाण्याचा सल्ला गोविंदला देते. एके रात्रीं तीं दोघे पळून टोळीपासून दूर जातात. हरीला फसवून त्याच्याकडून पळवलेले दागिने व चुनिलालचें पैसे भरलेलें पाकीट सीता गोविंदला दाखवते. त्या पैशांतून ते आगगाडीचें तिकीट काढून चिखलवाडी नांवाच्या गांवाला जातात. त्या गांवांत गेल्यावर सीता अन्न व कपडे विकत आणते. ते पोटभर जेवतात आणि माळावर रात्रीं जातात. त्या रात्रीं सीता नवीन साडी व दागिने घालून गोविंदसमोर उभी राहाते आणि तिचें सुंदर रूप पाहून गोविंदचा मोह अनावर होतो आणि त्या रात्रीं माळावर दोघांचें मीलन होतें. त्या दोघांचे मुक्त सुखी जीवन आतां सुरू झालें. मधून मधून गोविंदला सुमित्रेची व आपल्या गोड छोकऱ्यांची आठवण येई व चालू जीवनामुळें त्यांच्याशीं होत असलेली प्रतारणा उमजून तो अस्वस्थ होई. सीता आतां गर्भवती होती आणि त्यामुळें तर सीतेचा विश्वासघात करण्याचा विचारही मनांत आणणें त्याला पटलें नसतें. पण अचानक एके दिवशीं सीता विजाबादला निघून गेल्याचा निरोप गोविंदला मिळतो आणि गोविंदला पुन्हां एकदां धक्का मिळतो. आतां तो पुन्हां एकटा एकाकी होतो. भटकत भटकत तो पुढें जातो. पुन्हां त्याचा कुष्ठरोग बळावतो आणि जीवनावरची त्याची पकड पुन्हां सैल होऊं लागते. विषण्ण चित्तानें तो भटकत भटकत 'पार्क' नांवाच्या कुष्ठधामाच्या दारांत येऊन पोंचतो. तिथलें वातावरण त्याला पुन्हां आशावादी करतें. त्या रुग्णालयाचे प्रमुख डॉ. गोडबोले त्याला तपासतात आणि त्याला ठेवून घेतात. गोविंदला तिथला दिनक्रम आवडतो आणि तो पुन्हां एकदां आशेनें तिथलें औषधपाणी व परिचर्या पत्करतो. त्याची प्रकृति सुधारूं लागते. डॉ. गोडबोले एका विशिष्ठ औषधाचा त्याच्यावर प्रयोग करतात व त्यामुळें त्याच्यावर अनुकूल प्रतिक्रिया होऊन तो रोगमुक्त होतो. तिथल्या एका रुग्णाकडून त्याला कळतें कीं बीजाबादच्या रुग्णालयांत सीता नांवाची एक बाई अतिशय आजारी असतां दाखल होऊन त्या आजारांत मरण पावते. भटक्या जीवनांतला अखेरचा आशामय तंतु ह्या बातमीनें तुटतो. आतां सुमित्रा व त्याची मुलें त्याच्या डोळ्यासमोर सारखीं येतात. अखेरच्या डॉक्टर तपासणीनंतर तो निरोगी झाल्याचें समजतांच त्याला आनंद होतो. पण त्याला देखरेखीसाठीं आणखी एक वर्ष तिकडे कंठावें लागतें. एके दिवशीं डॉक्टर गोडबोले त्याच्या सासऱ्याला गोविंदच्या रोगमुक्ततेबद्दलचें पत्र लिहितात आणि त्याचा सासरा प्रत्यक्ष तिथें येऊन पोहोंचतो. गोविंदला पाहून त्याला आनंद होतो, आणि सुमित्रा व मुलांना घेऊन एका परगांवीं पुन्हां एकदां नवीन संसार थाटण्यासाठीं लवकरच येण्याचें आश्वासन देऊन त्याचा सासरा परततो. 'पार्क' सोडतांना आपल्याजवळ असलेली लुटीची माया गोविंद हॉस्पिटलला दान करतो व कुष्ठरोग बरा करण्याच्या इलाजांवर ते खर्च करण्याची विनंति करून डॉक्टरना ते पैसे स्वीकारण्याची गळ घालतो. अशा तऱ्हेनें गोविंदच्या दुर्दैवाचा फेरा संपून पुन्हां गोविंद आपल्या मुला-माणसांत नवें जीवन सुरू करतो.

हें सर्व कथानक तपशीलानें देण्याचें कारण कीं सिमिअन्स ह्यांची मूळ कादंबरी किती सुरेख व सहृदयपणें विणलेली आहे हे वाचकांच्या ध्यानांत यावें तसेंच श्री. ठोमरे ह्यांनी ह्या कादंबरीचा केलेल्या अनुवादाचें तुलनात्मक परिक्षण करतां यावें हाहि एक उद्देश आहे.

'ऋणभारांत' ठोमऱ्यांनीं विशद केलेल्या भूमिकेशीं ते प्रामाणिक राहिले असते तर प्रस्तुत अनुवादाची स्तुति इतर वर्तमानपत्री परमार्षकांपेक्षां प्रस्तुत लेखकानें कदाचित् कांकणभर जास्तच केली असती. श्री. ठोमरे हे माझे स्नेही आहेत. त्यांचें लेखन मी निष्ठेनें व आवडीनें वाचलेलें आहे व माझी आवडनिवड स्पष्टपणें त्यांना सांगण्याचें धैर्य मी दाखवलें आहे. आणि म्हणून त्यांच्या प्रस्तुत अनुवादाचें कठोर परिक्षण करण्याचें काम मीं पत्करलें आहे.

अनुवादकानें आवश्यक वाटल्यास संक्षेप करावा पण तो जिथें पाल्हाळ असेल तिथेंच. इतरत्र कात्री लावणारा कलाकृतीचें सौंदर्य विघडवून कसा टाकतो ह्याचें उदाहरण प्रस्तुत अनुवाद आहे. मूळ कादंबरीचे पहिले तीन भाग ठोमऱ्यांनीं सर्वसाधारणपणें मूळ कथानकाशीं मिळते जुळते अनुवादित केले आहेत. पण चवथ्या भागांत त्यांनीं मूळ लेखकाला गुंडाळून ठेवून आपल्या कल्पनाशक्तीला चाकोरीबाहेर स्वैरपणें वावरूं दिलें आहे.

गोविंद विजाबादच्या रुग्णालयांतून बाहेर पडतो इथून चौथा भाग सुरू होतो. मूळ कथानकांत प्लेगच्या उठावामुळें टोळीची उपासमार होऊन ते सर्व जंगलांत जातात असें आहे व तिथें सीता गोविंदला पुन्हां भेटते असें दाखवलें आहे. ठोमऱ्यांनीं आपल्या कल्पनाशक्तीनें शिवरामला (गोविंदला) रानांत एकटाच सोडून टोळी पळून जाते असें दर्शवून त्याला एका बैलगाडींतून थेट स्टेशनवर पोंचून 'मिरज कोल्हापूरकडच्या पार्क'चं तिकिट काढून त्याला गाडींत बसवून वेगानें कथानक पुढें नेलें आहे. ठोमऱ्यांनीं निर्माण केलेल्या स्टेशनच्या बुकिंग क्लार्कच्या सोयीसाठीं दक्षिणेंत भटकणाऱ्या शिवरामला मध्यप्रदेशांत भटकायला लावून 'सिक्स्टीन् अप'नें





कल्याणच्या गाडींत बसवलें आहे. पोर्टरच्या [illegible] प्रवासांत 'मलमाड' अगोदर येतें ह्याचा उल्लेख आहे.' ह्यावरून सुज्ञ वाचकांनीं रेल्वेचा नकाशा तपासून कथावस्तुची जाणीव करून घ्यावी. रुग्ण शिवरामला ठोमऱ्यांनीं इगतपुरीला पुरीभाजी खायला दिली आणि बुकिंग क्लार्कच्या सूचनेप्रमाणें चिखलवाडीला जाण्यासाठीं कल्याणला गाडी बदलायचा त्याचा त्रास वाचवण्यासाठीं तीच गाडी थेट मुक्कामीं नेऊन शिवरामला फटफटीत पहांटेला नेऊन सोडलें आहे. असें करण्यांत श्री. ठोमऱ्यांनीं मूळ कादंबरींतल्या महत्वाच्या पात्राला-सीतेला गाळून शिवरामच्या आयुष्यांतल्या महत्वाच्या घटना अनावश्यक ठरवल्या आहेत. एवढेंच करून ठोमरे थांबलेले नाहींत. त्यांनीं ( त्यांच्यामतें मूळ लेखक लोकजीवनाच्या तपशीलांत तोकडा ठरल्यामुळें ) डॉक्टर गोडबोल्यांना पार्कमध्यें प्रार्थनामंदिरांत धोतर, नेहरू शर्ट आणि शाल पांघरवून गीताईचें प्रवचन करायला लावून व त्याच्या जोडीला गायत्री मंत्र आणि बंगाली गीताचा जयघोष करवून आंतरभारतीचें वातावरण निर्माण केलें आहे. ह्यानंतर ठोमऱ्यांनीं शिवरामचें दुर्दैव परिणामकारकतेनें रंगवण्यासाठीं सुमित्रेला महिलाश्रमांत ठेवून ट्रेनिंगचें शिक्षण पुरें करावयास लावलें आहे, मुलांना बोर्डिंगमध्यें ठेवलें आहे, व त्या सर्वांचा समाजकंटकांकडून ( महारोग्याची मुलें ) छळ करविला आहे. एवढ्यानेंच पुरे होणारे नाहीं कीं काय म्हणून बालबोधी वास्तववादासाठीं बायकोमुलांना कादंबरीच्या अखेरीस हॉस्पिटलांत आणून त्यांची शिवरामशीं भेट घालून देऊन शेवट 'गोडच गोड' करून कादंबरी संपवली आहे. अशा तऱ्हेनें मूळ कादंबरीचे चार-पांच व सहा भाग काटून छाटून एकत्र करून चार भागांत परिपूर्ण व सुटसुटीत अनुवाद बनवून वेळींच हात आवरला आहे. वानगीदाखल अनुवादकांच्या क्रिमयेचें हें एक उदाहरण जरी मीं दिलेलें असलें तरी सबंध अनुवादांत अनेक ठिकाणीं श्री. ठोमऱ्यांनीं रंधा फिरवून कथानकांतले खड्डे उंचवटे गुळगुळीत केल्याचें प्रत्ययास येतें. शिवरामच्या हातमशिनींचे पायमशिनींत रूपांतर केले, कुष्टरोग्यांच्या पदरीं असलेल्या चिल्लरीचें नोटांत रुपांतर केलें, शिवरामच्याऐवजी हॉस्पिटलच्या दरवानाला बापूच्या टोळीची मार्गप्रतीक्षा करायला लावली आहे, अशी किती उदाहरणें देतां येईल.

कादंबरीचा 'सेल' व्हायला त्यांत थोडा श्रृंगार अगर कामोद्दीपक वर्णनें असणें आवश्यक आहे हा ठोमऱ्यांचा व्यावहारिक हिशोब त्यांनीं इथें कसा जमवला आहे ह्याचें फक्त एकच उदाहण देतों. मूळ कादंबरींत गोविंद पॅथॉलॉजिकल् लॅबोरेटरींत जातो त्यावेळीं त्याला तिथें नोकरीस असलेली गोरी बाई दिसते. मूळ कादंबरींत तो तिच्याकडे पहातो असें सांगितलें आहे पण अनुवादांत ठोमऱ्यांनीं तिची 'कर्पूरगौर गोरी गुलावी गरगरीत पुष्ट मांडी, तिची नितळ त्वचा अन् तीवरील पिंगट भुरी लसलस करणारी लव' शिवरामला अधाशी, अतृप्त नजरेनें पुन्हां पुन्हां पहायला लावली आहे. एवढेंच नव्हे तर 'तिचा विमुक्त कचसंभार, अवखळ डोळे, रसरशीत ओठ, गोरा गळा, उभार वक्षस्थळ आणि तें दुभंगणारी घातकी पोकळी—पुष्ट नितंब, बाकदार जांघ आणि घट्ट निमुळत्या सुडौल पोटऱ्या' इत्यादि अंग प्रत्यंगांचें सखोल व उठाव वर्णन मूळ कादंबरींत लेखकाच्या तोकड्या स्त्रीदेहज्ञानामुळें राहून गेलें होतें तें ठोमऱ्यांनीं आपल्या अनुवादांत देऊन मूळ लेखकापेक्षां ह्याहि प्रांतांत आपण कसे अधिकारी आहोंत हें सिद्ध केलें आहे.

आतां विचार करायचा म्हणजे कादंबरीच्या पात्रांच्या नांवांचा. वर दिलेल्या मूळ कादंबरीच्या कथानकावरून कुणालाहि उमजेल कीं मूळ लेखकानें आपल्या पात्रांना महाराष्ट्रीय वा इतर भारतीय नांवें दिली आहेत. पण ठोमऱ्यांना तें यथार्थ न वाटून त्यांनीं आपल्या पाळण्यांत सर्व पात्रांना घालून नामकरण विधि उरकून घेतला ( किंबहुना ख्रिश्चन लेखकाच्या पात्रांचें शुद्धीकरण करून घेतलें असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. ) कथानायकाचें 'गोविंद' हें चांगलें नांव बदलून त्याला 'शिवराम' केलें, पेंटर रामकृष्णाला 'बाबा मिस्त्री' ( बाबुराव मिस्त्री बाबूराव पेन्टर ह्या न्यायानें ) डॉक्टर गोपालला 'डॉक्टर बझे', प्रेमलाला 'अंबू', इत्यादि बदलांवर ठोमरे संतुष्ट न राहातां त्यांनीं गोविंदच्या तीन मुलांची नांवें मुकुंदा, अरुणा व मार्कंडेय, तसेंच मूळ कादंबरींतल्या अनामिक न्हाव्याचा देखील 'भाऊ बारक' बनवला आणि खुद्द मूळ लेखकाचा उद्धार करण्यासाठीं सिमिअन्सचा 'सिमन्स' करून टाकला. ही नांवें ठेवण्याबाबतची ठोमऱ्यांची भूमिका व्यवसायसंबंधी आदर्श नामावलि तयार करण्यासाठीं त्यांनीं केलेल्या सखोल संशोधनात्मक अभ्यासाचें पूर्णफल आहे व अनुवाद नवीन कादंबरी किंवा कथा, नाटकें, काव्यें लिहिणाऱ्या भावी लेखकांनीं ठोमऱ्यांच्या ह्या अभ्यासपूर्ण प्रयत्नांची जरूर दखल घ्यावी.

'सिंहाचा मुखवटा' ह्या कादंबरीच्या पुरस्कारांत काकासाहेब कालेलकरांनीं कुष्ठ रोगावर एक प्रबंध लिहिण्याचें पत्करून हळूंच जातां जातां ठोमऱ्यांचें लेखनस्वातंत्र्य गौरविलें आहे. पण त्या बरोबरच ते मूळ कादंबरी वाचण्याची शिफारस अत्याग्रहानें करतात हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. श्री. खांडेकरांनीं पळवाट काढून दुसऱ्याच एका कुष्ठ रोगावरील कादंबरीची महत्ता वर्णिली आहे. ह्यामुळें खुद्द अनुवादकाला 'ऋणभरांत' आपल्या 'स्वतंत्र कलाकृतीचें आणि एका उत्कृष्ट रूपांतराचें' गोडवे गाण्याची पाळी आली आहे.

हें 'स्वैर रूपांतर' करतांना ठोमऱ्यांनीं मूळ लेखकाला उंचावण्याची भूमिका मनांत ठेवली नसती तर, त्याच्या ठायीं असलेल्या त्याच्या पूर्वपरिचित अनुवादकाच्या शैलीनें हा अनुवाद उत्कृष्ट उतरला असता. पण मूळ लेखकाला मराठी समजत नाहीं ह्याची खात्री झाल्यामुळें म्हणा अगर सध्यां दुर्मिळ असणारी मूळ इंग्रजी कादंबरी वाचकांना पडताळतां येणार नाहीं म्हणून कीं काय ठोमऱ्यांनीं प्रकाशकांच्या परवानगीनें आपली कारागिरी मुक्तपणें व सढळ हातानें केली आहे आणि त्यामुळें सुंदर झांजिबारी पोपट घरच्या तयार पिंजऱ्यांत मावत नाहीं म्हणून त्याची शेपटी व पिसें निर्घृणपणें कापून वर तीं अनावश्यक व सौन्दर्यविघातक होतीं असें समर्थन करण्याचा आव त्यांनीं आणला आहे.

'सिंहाचा मुखवटा' एवढेंच फक्त मूळ कादंबरीच्या नांवाचें इमानी रूपांतर करणाऱ्या ह्या कादंबरीच्या मुखवट्यांत सिंह कुठेंच न दिसल्यामुळें इसापनीतींतल्या सिंहाचें कातडें पांघरणाऱ्या प्राण्यासारखी ही कलाकृति दिसते एवढेंच नम्रपणें नमूद करावेंसे वाटतें.

• • •






( पान १७ वरून चालू )

उमजूच शकत नाहीं. पण लडाखचें संकट डोळ्यांसमोर दिसत असतांहि नेहरूंचा हा सर्व परराष्ट्रसंबंधविषयक दृष्टिकोन मला बरोबर वाटतो.

\+ + +

पण मग पुढें काय? लडाख लाल चीननें गिळून टाकला असतां भारतानें स्वस्थ बसायाचें काय? 'अति शहाण्याचा बैल रिकामा' अशी ही परिस्थिति वाटते. नेहरूंच्या परराष्ट्रसंबंधविषयक धोरणाचें जितकें अधिक सुविचारयुक्त व विद्वत्तायुक्त समर्थन करावें तितकें लडाखप्रकरणं अपरिहार्य मानून स्वस्थ माशा मारीत बसावें असें अनुमान काढायचें काय? मग विद्वत्ता आणि सुविचार यांच्या साहाय्यानें अपमानापुढें मान वाकविण्याचें अनुमान काढण्यापेक्षां माथेफिरूपणानें प्रतिकार करण्यास प्रवृत्त होणें हेंच योग्य नव्हे काय? तें योग्य ठरणार नाहीं. आजच्या हायड्रोजन बॉंबच्या जगांत माथेफिरूपणाला जागा नाहीं. आणि सुविचाराचा रस्ता अगतिक झाला आहे असें नाहीं. लाल चीननें लडाख गिळल्याचा बोभाटा नेहरूंनीं आतां खूप केला आहे. आमच्यावर लाल चीननें आक्रमण केलें असून चीनचें व भारताचें पूर्वी खूप दुथड्यांनीं वाहणारें सारें प्रेम आटून गेलें हेंहि आतां जगाला कळलें आहे. चीनबाबत खास स्नेहाची अथवा वशिल्याची भाषा नेहरूंची बंद झाली असून अमेरिकेला त्यामुळें नेहरू व भारत यांबद्दल अधिक आपुलकी वाटूं लागली आहे. त्याबरोबरच गेल्या बारा वर्षांत जगाला युद्धापासून मागें खेचण्याचा प्रयत्न जो नेहरूंनीं केला त्याची उपयुक्तता पाश्चात्य राष्ट्रांना अलीकडे विशेष प्रकारें पटूं लागली असून भारताबद्दल व नेहरूंबद्दल त्यांना प्रेम वाटूं लागलें आहे. भारताच्या आर्थिक विकासास अधिक मदत करावी व भारतांतल्या लोकशाहीला टिकण्याला मदत करावी हाच मार्ग जागतिक शांतता व लोकशाही या दृष्टीनें योग्य आहे हें पश्चिमी राष्ट्रेंहि कबूल करूं लागलीं आहेत. चीननें भारताचा आणखी मुलुख जिंकल्यास मात्र माथेफिरूपणानेंहि युद्ध करण्याचें असें आतां जवळजवळ भारत सरकारनें ठरविलेलें दिसतें. असें युद्ध सुरू झाल्यास त्यांतून जागतिक युद्ध उद्भवण्याचा संभव आहे हें आतां चीनलाहि दिसूं लागलें असून चीन अमेरिकाविरोधी प्रचार अधिक निकरानें करूं लागला आहे. युद्ध होऊंच नये ही परिस्थिति सर्वोत्तम. पण भारत आणि चीन यांचें युद्ध सुरू झालें आणि त्यांतून जागतिक युद्ध उद्भवलें नाहीं तर परिस्थिति फारच वाईट. आतां संभव असा दिसतो कीं रशियाला युद्ध नको असल्यामुळें चीनच्या आक्रमण-प्रवृत्तीला रशियानेंच आळा घातला पाहिजे. ही गोष्ट कदाचित् घडून आली तर जगांतील इतर कोणत्याहि राष्ट्रापेक्षां भारताला तें हितप्रद होईल. म्हणून चीनशीं फारसा प्रक्षोभ न वाढू देतां रशियाशीं सख्य ठेवण्याचा प्रयत्न नेहरू करीत आहेत. पण तिसरें महायुद्ध जर शेवटीं अपरिहार्यच ठरलें तर तें ज्या गेल्या १३ वर्षांत झालें असतें त्यांतील कोणत्याहि वेळेपेक्षां आजच्या परिस्थितींत होण्यांत भारत त्याला तोंड देण्याला अधिक समर्थ आहे. कारण येथें सर्वांगीण प्रगति बरीच झाली असून आज जगांतील बड्या राष्ट्रांचा स्नेहहि भारताला अधिक प्रमाणांत लाभला आहे.

\+ + +

नेहरूंच्या परराष्ट्रधोरणाचें कदाचित् कोणास ओढून ताणून केलें असें वाटणारें पण माझ्या दृष्टीनें शास्त्रशुद्ध असलेलें हें समर्थन केल्यानंतर मला त्यांच्या अंतर्गत आर्थिक धोरणासंबंधानें असें बोलता येत नाहीं याबद्दल वाईट वाटतें. चीननें लडाखवर केलेल्या आक्रमणापेक्षां भारतावर आलेलें अधिक मोठें संकट म्हणजे सरकारला बाजारभाव स्थिर करतां येत नाहींत व नियोजन सुयंत्र चालविता येत नाहीं हें आहे. स्वतः नेहरूंनीं अनेक वेळां आर्थिक नियोजन पार पाडणें हाच चीननें आक्रमण मागें हटविण्यासाठीं अवश्य तें सामर्थ्य वाढविण्याचा उपाय आहे असें अनेकदां म्हटलें आहे. पण आर्थिक नियोजनाच्या बाबतींत सर्वत्र अत्यंत ढिलाई चालू आहे. वॉल्टर लिपमन हिंदुस्थानांत येऊन येथील परिस्थिति पाहून गेले. आणि येथील लोकसंख्येचा वाढता वेग व येथील अन्नउत्पादनाची तुटपुंजी वाढ यांचा विचार करतां पुढील पांच-सहा वर्षांत हजारों माणसें उपासमारीनें पटापट मरूं लागतील एवढा धोका उत्पन्न झाला असूनहि येथें मोठमोठ्या पुढाऱ्यांना त्याचें कांहीं वाटतहि नाहीं, सर्वत्र सर्वजण सुस्त आणि आत्मसंतुष्ट आहेत हें लिपमननीं पाहिलें आणि आमच्या या जनावरी वृत्तीबद्दल आश्चर्य व्यक्त केलें आहे. सरकारला बाजारभाव स्थिर ठेवतां येत नाहींत हें एकटेंच संकट नसून सार्वत्रिक आर्थिक अनास्थेचें व अव्यवस्थेचें तें लक्षण आहे. येथें लोकशाही आहे हें म्हणणें ठीक आहे. पण ही कर्तृत्वशून्य लोकशाही आहे. इंग्लंडांतील कर्तबगार व नियोजनप्रवीण लोकशाहीच्या अगदीं विरुद्ध अशी ही लोकशाही आहे. कार्यक्षम आर्थिक संघटना उभारण्याची शक्ति नेहरूंत नाहीं, कॉंग्रेसमध्यें नाहीं, दुसऱ्याहि कोणत्या पक्षांत नाहीं. लोकशाही ही या अकार्यक्षमतेची नुसती सबब झाली आहे. हुकुमशाही आम्हांला नकोशी वाटते हें ठीक आहे. पण स्टालिननें अथवा मावत्से तुंगनें हुकुमशाहीनें कां होईना कार्यक्षम आर्थिक संघटना उभारली तशी आर्थिक संघटना आम्हांला हुकुमशाहीनें उभारता येत नाहीं व लोकशाहीनेंहि उभारता येत नाहीं. ही अंतर्गत आर्थिक दुर्बलता हा आमचा खरा दोष आहे. लडाखनें नेहरूंचें परराष्ट्रीय धोरण चुकीचें आहे असें मुळींच सिद्ध केलेलें नाहीं. पण कोणत्याहि राष्ट्राचें संरक्षणबल हें ७५ टक्के अंतर्गत आर्थिक बलावर अवलंबून असतें ही गोष्ट लडाखप्रकरणानें भारताच्या मनावर बिंबवली असती तर चीननें हा भारतावर उपकार केला असें मी मानलें असतें. नेहरूंचें आणि कॉंग्रेसचें नेतृत्व यांबाबतींत फार अपुरें पडत असून इतर कोणीच त्यांची जागा भरून काढूं शकत नाहीं हें या राष्ट्राचें खडतर दुर्दैव होय.

● ●

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून
दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.








'ऑगस्ट' हा भारतीय जीवनाशीं समरस झालेला मास-श्रेष्ठ.
'छोडो भारत' ही गांधीजींची वेदवाणी याच महिन्यात १९४२ सालीं आम्हीं ऐकली. आणि
इंग्रजानी भारत सोडला तोहि याच महिन्यांत १५ ऑगस्ट १९४७ रोजीं.
अशा या श्रेष्ठ मासांत घडलेल्या क्रांति-यज्ञाची स्मरणांजलि म्हणून

## दीपावली चा

ऑगस्ट महिन्याचा अंक हा

## "क्रांति-संस्मरण विशेषांक"

म्हणून प्रसिद्ध होईल.

**या क्रांतियज्ञाचें जिवंत चित्रण—अनेक नामवंतांनी रेखाटलेलें—**
**"काळ बोलतो आहे"**— शिवाय
**उत्कृष्ट कथा, भावरम्य कविता, लेख, नेहमीची सदरें इ०**
**• आल्हाददायक नूतन रंगीत मुखपृष्ठ. • हास्य चित्रें, व्यंगचित्रें —**
**आणि भारताच्या भाग्यविधात्याची ४ थी अनेकरंगी भेट.**

एजंटानीं आपली मागणी १० तारखेच्या आंत करावी.

**किंमत रु. १।**

---

नव महाराष्ट्राचें सुहास्य वदनानें स्वागत करण्यासाठीं दिवाळीहि यंदा अधीरतेनें लौकर येत आहे
कोटि कोटि रसिक वाचकानीं **दीपावली** चें नेहमींच अपार कौतुक केलें आहे.
रसिकांच्या या वाढत्या लोभाची जाणीव ठेवून यंदाहि




वार्षिक १९६०

प्रतिवर्षींच्या सर्व दर्जेदार वैशिष्ट्यांसह
ऐन दिवाळींत प्रसिद्ध होत आहे.

## दीपावली हिंदी

**आपल्या नेहमींच्या वैभवानें याचवेळीं प्रसिद्ध होईल.**

पृष्ठें २०० च्या वर  किं. रु. ३ + र. पो. १ रु.

**दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, कॅनेडि ब्रीज, मुंबई नं. ४.**

